# मी.... कुंठामती....

**लेखक :–** पुरुषोत्तम तळेगांवकर

**संकलन :–** प्रा. जान्हवी पुरुषोत्तम तळेगांवकर

**ई साहित्य प्रतिष्ठान**

# मी.... कुंठामती....

## लेखक :– पुरुषोत्तम तळेगांवकर

### संकलन :– प्रा. जान्हवी पुरुषोत्तम तळेगांवकर



संपर्कासाठी पत्ता –
प्रा. जान्हवी तळेगांवकर
“कैवल्यम” ६ / ब विद्यानगर,
भुसावळ हायस्कूल जवळ,
भुसावळ (४२५२०१)
Mobile No. 9422784993. 9421874925
Email – janhavi1265@gmail.com
Abaji_theater@rediffmail.com

**मुखपृष्ठ : सौजन्य : श्री निलेश जाधव**
**अक्षर जुळणी : संजय कुळकर्णी**
**प्रकाशक : ई साहित्य प्रतिष्ठान**
www.esahity.com
esahity@gmail.com

**प्रकाशन : ०१ ऑगस्ट २०१६**



# विनम्र अभिवादन !

पुरुषोत्तम मल्हारी तळेगांवकर,नाट्य प्रांगणात उत्तम ठरलेला हा पुरूष, त्याच्या साहित्यिक तसच कौटुंबिक भावविश्वात हक्कानं मिळालेल्या राजू तळेगांवकर या बिरूदावलीसह खऱ्या अर्थाने जगला. लेखन, अभिनय, दिग्दर्शन अशा वैविध्य पूर्ण भूमिका त्यानं आयुष्याच्या रुपेरी पडदयावर साकारल्या. अभियांत्रीक शैक्षणिक पार्श्वभूमी असूनही या अवलीयाला रंगभूमीच्या हातची कठपुतळी होणं अधिक रुचलं.“खान्देशचा हिरा” मुंबई पुण्याची आकर्षित नाट्य वतंनदारी नाकारत कर्मभूमीतच आपली कला रुजविण्यासाठी अखेर पर्यंत आग्रही राहिला. नाट्यक्षेत्रातील त्यांच्या उत्तुंग कामगिरीबद्दल भुसावळकरांनी “भुसावळ भुषण” पुरस्कार देवून त्यांचा गुणगौरव केला. आयुष्याचा जोडीदार म्हणून त्यानं नाटकवेडी ‘एक हट्टी मुलगी’ निवडली. तेंडूलकर, शिरवाडकर, एलकुंचवार, मतकरींचा नाटयलेखन प्रवास या कलाकारासाठी भूरळ पाडणारा असायचा. यातूनच थोडी

मैफल जमली तरी त्याच्यातील ‘नटसम्राट’ आपसूकच संवाद व अभिनयाद्वारे प्रकट व्हायचा. आवाजाचा हा ‘राजा’ संवाद, पटकथा, जाहिरात या क्षेत्रातही स्थिरावला. माणासाच्या मनातील भावभावनांना हळूवार स्पर्श करण्याच सामर्थ त्याच्या विचारात व शब्दात दिसून येत असे. सभोवतालच्या प्रतिमांना सुप्त विचारांच रुप देणारं, त्याचं आवडतं नाट्यलेखनाचं माध्यम निश्चितच यशस्वी ठरलं. मोठयाचा मार्गदर्शक ते लहानांमध्ये लहान होणं अशा भूमिकेत तो अलगद शिरायंचा. नट म्हणून रंगभूमीवर उभा असतांना त्याच्या आवाजाच गारुड समोरच्या प्रेक्षकास संमोहित करीत असे.असा हा खान्देश भूमीचा ‘राजा’, लेखक,नट,नाटकार पुरुषोत्तम तळेगांवकर यांच्या स्मृतींस विनम्र अभिवाद !

**श्री. वीरेंन्द्र तळेगांवकर**

**(विशेष प्रतिनिधी, लोकसत्ता, मुंबई )**



## प्रस्तावना

पुरुषोत्तम तळेगांवकर..... एक सखोल.... मनस्वी..... व्यक्तिमत्व ! माणसाच्या मानसिक जडणघडणीचा घेतलेला वेध त्यांच्या लिखाणातून दिसून येतो. माणसाचे मन एक अजब रसायन आहे. त्याचा वेध घेण्याचा जेवढा प्रयत्न केला तेवढे त्याचे विविध पैलू समोर येतात. माणसाच्या 'मन' नावाच्या फॅक्टरीतून बाहेर पडणाऱ्या विविध आकार, उकार, हुंकाराची कधी लोभस, प्रसन्न, ध्येयवेडी, समजूतदार तर कधी छिन्नविछिन्न, दिशाहीन, आधार हरवलेली रूपं बघितली कि स्तिमित व्हायला होत. अश्याच मनाच्या बहुरंगी, बहुढंगी, मनतरंगांचा आयाम मापण्याचा प्रयत्न पुरुषोत्तम तळेगांवकरांच्या लिखाणातून दिसून येतो. "मी.... कुंठामती...." हा पुरुषोत्तम तळेगांवकर लिखित पाच एकांकिकांचा संग्रह आपल्यासाठी सादर करीत आहोत. मराठी रंगभूमीसाठी विचारांची ही शिदोरी रंगकर्मीच्या आणि वाचकांच्या निश्चितच पसंतीत पडेल. अशी आशा आहे.

**प्रा. जान्हवी तळेगांवकर**




# अर्पणपत्रिका

पुरुषोत्तम तळेगांवकर यांच्या नाटय व साहित्य क्षेत्रातील अविस्मरणीय प्रतिमेस सादर अपर्ण......

**– प्रा. जान्हवी तळेगांवकर**



# संग्रहित एकांकिका

१. कुंठामती
२. अभ्यागत
३. मी
४. छिन्न राने
५. अधांतरी

# १) कुंठामती

(रंगमंचावर मध्यभागी जेलच्या दरवाजाचा कट आऊट. त्याच्या मागे झोपण्यासाठी जेलमधे असतात तशी दोन बाकडी दरवाज्या बाहेर पहारेकऱ्याला बसण्यासाठी स्टुल, कुठ तरी कोपऱ्यात एक फोल्डींगची खुची)
प्रकाश उजळतो तेव्हा रात्र. रातकिडे किरकिरत आहेत. लांबवरून घंटांचे टोल. मधूनच येणारी – सब कुछ ठिक है – अशी गस्त घातल्याची आरोळी. कोठडीमध्ये एक स्त्री, गुडघ्यामध्ये मान घालून बसलेली.
काही क्षण हेच दृष्य. आता पुरुष रखवालदार प्रवेश करतो. रखवालदार वाटाया असे कपडे. हातात दंडुका. स्टुलावर बसतो. निवांतपणे तंबाखुची फक्की मारतो. आता त्याचे लक्ष कोठडीतल्या स्त्री कडे जाते. तिला हाक मारत.)

**पु.** : बाई वं बाई झोप लागत न्हाय जनु ?

**स्त्री :** (फक्त त्याच्याकडे रोखून बघते).

**पु** : न्हाय म्हनलं रात लै झालीया पन तू अजून जागीच. झोप येत न्हाय का?

**स्त्री** : झोपल्यावर झोप लागत नाही.

**पु** : काय बोलतेस गं बाई तू ? झोप येते, अन्, झोप लागत बी न्हाय?

**स्त्री** : (उसासून) हो, हे असंच सुरु असतं. जागं असतांना वाटतं आपण झोपलो आहोत, आणि, झोपलेलो असतांना वाटतं आपण जागे आहोत.

**पु. :** मती फिरली का गं बाय तुझी ? काय आक्रीत सांगून ऱ्हायलीस ?

**स्त्री** : तुम्हाला जे समजायचं ते समजा. (स्तब्धता)

**पु** : बरं. त्ये जावू दे. बाहीर येतीस ? पाय जरा मोकळे व्हतील.

**स्त्री** : तुम्ही मला या कोठडीच्या बाहेर काढणार ?

**पु** : व्हय.

**स्त्री** : (दरवाजापाशी येत) आश्चर्य आहे.

**पु :** त्यात कसलं आश्चर्य गं भवाने ?

(त्याने तिला कोठडीच्या बाहेर काढलेले.)

**स्त्री** : पुरुष सहसा स्त्रीला कोठडीच्या बाहेर काढत नाहीत.

**पु** : आगं पन कोठडीच्या भाइर काल्ढं तरी पहारा ऱ्हातोचं नं आमचा. हा दंडुका कशापाई बाळगतो मं आम्ही ?

(स्तब्धता)

बैस. ती खुर्ची घे लागल तर बसायला.

**स्त्री :** नको. बसून बसून पाय भरून आलेत माझे. मोकळ्या हवेत थोडं फिरलं तर बरं वाटेल. (अवघडलेल्या वातावरणातून स्वत:ला बाहेर काढण्याचा प्रयत्नं करीत, स्व:तशीच पटपुटते)एक श्वास माझा असावा. एक ध्यास माझा असावा. सगळ्यांत राहून प्रत्येकाला. आपला आपला तारा असावा.

(पुन्हा खचून जाते)

थकलेलं जिवन असतं का, जिवन म्हणजे थकणं असतं, विचारांच्या या जाळ्यामधून बाहेर पडताच येत नाही.

पडताच येत नाही. (स्तब्धता)

(रखवालदार आतापर्यंत तिचे निरीक्षण करतो आहे.)

**पु** : कशा पाई कोठडीत कोडून घातलयं गं तुला ?

**स्त्री** : मला माहीत नाही.

**पु** : न्हाय, म्हंजे तु काय गुन्हा क्येला हाइस ?

**स्त्री** : काही आढवत नाही.

**पु** : (स्वत:शीच) मायला म्हंजे वरच्या मजल्यावर अंधारच हाय म्हनायचा.
(मोठ्याने) तुमा बायकांच ह्येंच आस्तं बग. जरा काही झालं, का लगेच
फ्युज जातो तुमचा आन मंग वरती अंधार. आगं बये चांगल्या,
चांगल्या घरच्या बायका या कोठडीत खितपत पडलेल्या म्या पायल्या हाईत.

**स्त्री** : आणि मग तुम्ही त्यावेळी काय करत होतात ?

**पु** : पहारा देत होतो नं बाय पहारा देण्याची जिम्मेदारी पुरुष मान्सावर टाकली का त्याला ते काम करावचं लागतं.

**स्त्री** : आमच्यावर पहारा देण्याची जबाबदारी तुमच्यावर कोणी टाकली ?

**पु** : सरकारं.

**स्त्री** : कुणाचं सरकार ?

**पु** : आपलंच सरकार आस्तं ना गं बये. आपन सगळ्या बाया मान्सानी
मिळून, आपलं सरकार निवडलेलं आस्तं बग, मग ते पुरुषांची नेमनुका करतात, पहारा देण्यासाठी.

**स्त्री** : का ? हे पहारा देण्याचं काम स्त्रिया नाही करू शकतं ?

**पु** : करू शकतात की. करतात बी. पन तिकडं त्या तिकडं पुरुषांची कोठडी हाय त्याच्यावर पहारा बाईचाच न्हातो बग.

**स्त्री** : पण हा भेदभाव कशासाठी ? पुरुषांनी पुरुषांच्या कोठडीवर पहारा द्यावा आणि स्त्रियांनी स्त्रीयांच्या.

**पु.** : (क्षणभर विचारमग्न होत) हां........ह्ये सांगायला आन एकायला लई
ग्वाडं वाटतंय बग. पन हे नियम आपन जनमताने तयार करतो. त्याला कोण काय करणार ? (उसासून) आज
तुला काय वाटतं. हि अशी
उलटापालट झाली तर तुझ्या कोठडीची शिक्षा कमी व्हनार व्हय ?

**स्त्री** : पण हि शिक्षा दिलीच का जावी ?

**पु** : ह्येच तर तुला अगुदर इचारलं व्हतं. बये, या कोठडीत तू कोणत्या गुन्हाची शिक्षा भोगाया आलीस ?

**स्त्री** : (उपरोधाने) हे चांगलं आहे. म्हणजे शिक्षा ठोठवायची तुम्ही आणि ती कां ठोठावली याची कारणं मात्रं आम्ही द्यायची

**पु** : हे आसंच चालत असतं गं बाय, आसचं चालत आस्त. आखून दिलेल्या नियमांमधलं ये सुध्दा येक कलम असावं बग. माणूस जातीचं असंच व्हत न्हातंय. का जलम घ्येतला त्ये कळत न्हाई. कशापाई मरन आलं त्ये बी कळतं न्हाइ अन् या मधल्या झांजरमोळ्या जिंदगीत आपन फक्त चालतं न्हायचं. चालन्याचें प्रश्नं व्हतात, कोणी तरी त्याची उत्तरं मागतो. आपन फक्त उत्तरं देत न्हायची.

(काही क्षण स्तब्धता)

**स्त्री** : मग मी तुम्हाला प्रश्नं विचारते तुमचं नांव ?

**पु** : पांडुरंग शिरीपत येर्लेकर.

**स्त्री** : वय ?

**पु** : पंचेचाळीस.

**स्त्री** : धंदा ?

**पु** : पहारा देने.

**स्त्री** : कुणावर पहारा ?

**पु** : बाईवर पहारा.

**स्त्री** : का म्हणून ?

**पु** : कारण बाईवर पहारा ठिवावाचं लागतो.

**स्त्री** : (जोरात) हे कुणी शिकवलं तुम्हाला ?

**पु** : आमच्या बापजाद्यांनी

**स्त्री** : त्यांना कुणी शिकलं ?

**पु** : त्यांच्या बापजाद्यांनी.

**स्त्री** : (अॅग्रसीवली) धिस पॉइंट शुड बी नोटेड मिलॉर्ड शतकानुशतकांच्या परंपरांनी यांना पहाऱ्यावर बसवलं आहे. आणि त्यात बळी जातो आहे तो एका स्त्रीचा. हाच मुद्दा आणखी विस्तार पूर्वक सांगायचा तर, कोठडीत डांबलेल्या स्त्रीचा बळी जायला हाच पहाऱ्यावरचा माणूस जबाबदार असतो. त्युाळे त्याचेवर कलम ३०२ अन्वये बळी घेतल्याचा गुन्हा दाखल करून याला मरेपर्यंत फाशीची शिक्षा ठोठावण्यात यावी.

**पु** : ऑब्जेक्शन युवर ऑनर. पहाऱ्यावर असणाऱ्या मान्सांमुळे स्त्रीचा कधीबी बळी गेलेला न्हाय. उलट तिचं संरक्षन व्हाव हाच कायद्याचा उद्देश अस्तु. माझ्या माहिती प्रमानं लईंच बायका या कोठडीत येतात अनं स्वत:ला डांबून घेत्यात.

**स्त्री** : स्त्रीला कोठडीत डांबण्याची प्रक्रिया –

**पु** : पहारा देनं ही नैसर्गिक प्रक्रिया हाय –

**स्त्री** : या प्रक्रियेला विरोध केला पाहिजे.

**पु.** : बाई मान्साच्या संगनमतान ह्यो कायदा झालायं.

**स्त्री** : आम्ही त्या कायद्याला आव्हान देत आहोत.

**पु** : असल्या छपरी आव्हानांना भिक घालायला कायदा कमजोरं नाय –
(ट्रान्समधून दोघं बाहेर येतात. दीर्घ शांतता.) बये, कायं बोलतं होतु गं आपुनं ?

**स्त्री** : माहित नायं.

**पु** : पन कश्याबद्दलं बोलतं होतु ?

**स्त्री** : आडवंत नाय

**पु** : पन काहीतरी बोलत होतु हे नक्की.

**स्त्री** : आपनं काय बोलत होतु, हे आपल्या दोघांनाही आठवतं नाय. म्हन्जे आपण निरर्थकच बोलत असु.
(शांतता)

**पु** : बये, अर्थाचं काय अनं बिनं अर्थाच काय, कवां कवां बोलनं म्हंजे साबनाचे बुडबुडे वाटत्यात बघ, म्हंजे बोलायचं एक, मनातं ठेवायचं दुसरं, अन् वागायचं तिसरं.

**स्त्री** : म्हणून तर सगळं निरर्थक वाटतं. हे असं कोठडीमध्ये डांबून घेनं सुध्दा.

**पु** : अगं व्हयं, म्हनून तर इचारल नां, कशापाई कोठडीत डांबून घेतलंस? सांगायचं असलं तरं साग बये. मन तेवढंच हलकं हुईल. काय क्येलस तूं ? सांगना, काय क्येलस तू ?

**स्त्री** : खून.......... (दिर्घ स्तब्धता)

**पु** : वाटलचं. वाटलंच मला. त्याच्या शिवाय कोणी आसं बंदीस्त कोठडीत येत न्हाय बगं.
(शांतता)
लय तरास व्हत आसलं न्हाई ?

**स्त्री** : कोणाला ?

**पु** : त्या जात्या जिवाला.

**स्त्री** : जिव जातांना त्रास तर होतचं असतो. ज्याचा जिव जातो त्याला सुध्दा आणि जो जिव घेतो, त्याला

सुध्दा. म्हणूनच असा जिवघेणा खेळ खेळल्यानंतर, स्वत:ला असं कोठडीत कोंडून घेतलं की थोडं तरी बरं वाटतं.

(शांतता)

**पु** : घरी कोन कोन हाय तुज्या ?

**स्त्री** : सगळे आहेत. नवरा, मुलं, सासू, नणंदा.

**पु.** : पोरं लहान हायती का ?

**स्त्री** : नाही. झालीत चांगली बारा पंधरा वर्षांची घोडी.

**पु** : चांगलं हाये, न्हाय म्हंजे पोरं मोठे असले तर हाल हूत न्हाई ग त्यांचे.

(शांतता)

तुझं हेय असं झालेलं बगून लय हळहळत असतील बिचारी. न्हाय गं?

**स्त्री** : कुणास ठावूक. मला तर वाटलं माझं हे असं झालेलं पाहून मनातून आनंदच झाला असेल त्यांना. दाखवत नसतील. पण झाला असावा. चला एक कटकट संपली. असाच काहीसा भाव असतो त्यांच्या चेहऱ्यावर.

**पु** : म्हंजे तु कटकट वाटायची व्हयं त्यान्ला ?

**स्त्री** : अहो बुवा, मीच काय आपल्या सगळ्यांच असं होतं, प्रेमाचे धागे क्षीण झालेले असले, की, एकमेकांची डोकेदुखी सुरु होते. आणि मग प्रत्येकाच्या मनात एक सुप्त इच्छा तरारून येते. आधी कोठडीत कोण जाईल म्हणून. सारामध्ये स्त्रिचं स्थान फार महत्वाचं असतं ना ! म्हणून मग जर तिच कोठडीत गेली तर सोन्याहून पिवळं. त्यामुळे माझ्या या अवस्थेची त्यांना फारशी खंत वाटत नसावी.

**पु** : (विचार करून) हिसाब नेम्मन हाय बग तुजा. पन तुला येक सांगू का ? घरातल्या कर्त्या पुरुषाच्या वाटाला पन हे भोग येतात बग. त्याला सुध्दा आसंच पहाऱ्या खाली येवून बसावं लागतं.

**स्त्री** : त्यात काही विशेष नाही. ते त्याचं कर्तव्यच असतं.

**पु** : काय, काय म्हनलीस तू ?

**स्त्री** : ते त्याचं कर्तव्य असतं.

**पु** : (दिल खुलासपणे हासतो) वा गं बये वा ! लय भारी भेजा हाय बग तुजा. न्हाय, मला वाटल, त्येवढा वरच्या मजल्यावर अंधार न्हाई बग. येक मोठ्या वातीची मेनबत्ती भगभून न्हायीलय बं तिथं.

**स्त्री** : कां ? असं का बोलता ?

**पु** : तू आता काय म्हनलीस, ते कर्त्या पुरुषाचं कर्तव्यंच असतं.

**स्त्री** : मग ? बरोबरच बोलले मी.

**पु** : व्हय गं बाई. तू बरोबरच बोल्लीस. पन माज्या येक ध्यानात येत न्हाई. म्हंजे बग, पुरुष पहाऱ्या खाली आला तर ते त्याचं कर्तव्य आन त्यानं तुमच्यावर पहारा दिला की, ती त्याची टगेगिरी. (मान हलवत) न्हाय, हा गुनाकार भागाकार माझ्या ध्यानात येत न्हाई बग.

**स्त्री** : बुवा, त्यासाठी तुम्हाला स्त्री व्हावं लागेल. स्त्रीचा जन्मं म्हणजे तळहातावरचा निखारा असतो. तळहातावर सुखाचे उमललेले फोड दिसतात, पण आतल्या ठसठसणाऱ्या वेदना दिसत नाही. ती वेदना, त्या भावना समजून घ्यायच्या असतील तर तुम्हाला स्त्री व्हावं लागेल.

**पु** : आसं म्हंतीय ? (थोडा वेळ विचार करतो.) चालं, मंग मी आता तुला येक गंमत सांगतु. अशीबी तुला झोप येत न्हाय, आन पहारा देन्याशिवाय मला दुसरा उद्योग न्हाय. तर येळ जावा, टाइमपास म्हणून आपण एक खेळ खेळू. या खेळामंदी तु व्हायचं पुरुष आन मी होतो स्त्री. बगु या याच्यानंतरी हा प्राब्लेम सुटतो का चाललं ?

**स्त्री** : (खळाळून हसते) अहो बुवा हे जे होईल ते नाटक असेल आणि नाटकात काहीसुध्दा खरं नसतं. स्त्रिचा अविर्भाव तुम्ही आणाल हो. पण मन ? मनाच काय ? स्त्रीचं मन

तुम्ही कुठून आणाल ?

**पु** : (शांतपणे) तू जिथून पुरुषाचं मन आनशील तिथून.

**स्त्री :** मला पुरुष माहीत आहेत. अंतर्बाह्य माहीत आहे. त्यामुळे त्याचं मन मी चांगलं ओळखते.

**पु** : आसंना ! मग मला पन बाई म्हाइत हाये. तु म्हंते तशी माहीत आहे. आन म्हणून मी सुध्दा बाईचं मन चांगलं वळखतो.

(किंचीत स्तब्धता)

चाला सुरु करायचा खेळ ? येक दोन साडेमाडे तीन (पोज घेऊन) आज घरी यायला लई उशीर झाला नाथा ?

**स्त्री** : (हसते) तुमची बायको अशी बोलते तुमच्याशी ?

**पु** : (हसतो) न्हाय, अशी न्हाय बोलत. पन तिनं असं बोलावं, असं मला वाटत, म्हणून मी तसा बोललो.

**स्त्री** : असं नाही, म्हणजे तुम्हाल स्त्रीचं मन कळलेलचं नाही. ती जे बोलते, मनापासून बोलते तसं बोला.

**पु** : आसं म्हंतीस. ठिक हाय. (पुन्हा पोज घेवून) या, आज घरी लवकर तडफडलात. पावशेराला छटाक भर कमी ढोसली की काय ? आज दुपारी पोराला चोरून सिगरेट वडतांना बगीतलं, आता तुमी छटाकभर कमी ठोसून

आलातं घरात कसा गुरुपुष्यामृताचा योग जुळून आल्या सारखा वाटतोय.

**स्त्री** : (पोज घेवून) ए...बडबडं बंद कर. जेवायला वाढ मुकाट्याने (शांतता) मी काय म्हणतोय ? जेवायला वाढ काय केलंय जेवायला ?

**पु** : चार अंड्यांची भाजी केली हुती. तिन पोरांनी संपवली आन एक म्या खाल्लं.

**स्त्री** : आन मंग माला ?

**पु** : आमटी हायकी भक्कम सारी. भाकरी चुरुन हादडा तिच्या बरूबर.

**स्त्री** : म्हणजे तुमच्यासाठी खस्ता खावून आम्हाला फक्त फुलकावणी आमटी मिळणार, आणि वरची मलाई काय तुम्ही हादडणार कारे भोसडीच्यांनो.

**पु** : झालं आसं यकांदा दिवस, तर काय बिघडलं ?

**स्त्री :** काय बिघडलं ? थांब तुला दाखतोय डुकरे

(पट्टा काढून मारण्यासाठी उगारतो.स्त्रिच्या विव्हळण्याचे थंड आवाज.
संपूर्ण दृष्यं फ्रिज झालेलं. काही क्षण हेच. शांतता दोघं भानावर आलेले
आपापल्या मुळ भुमिकेत.)

**पु** : पन मी माज्या बाईच्या अंगावर कंदी हात न्हाय उचलला.

**स्त्री :** आणि मी पण सगळी भाजी कधीच संपवली नाही.

**पु** : तशी माज्या बाईनं पन संपवली नव्हती. येक अंड ढिवलं हु तं माझ्यासाठी

**स्त्री** : पण मनात यायचं संपवली एखादा दिवस भाजी, तर काय बिघडलं ?

**पु** : आन मलाही वाटायचं, बायको लई गमल्या करते ना ? मंग हानले तिला दोन रट्टे तर काय बिघडलं ?

**स्त्री** : पण हे सगळं मनातल्या मनात वाटायचं.

**पु** : व्हयं हये समदं मनातल्या मनात वाटायचं.

**स्त्री :** पण बुवा,मनातल्या मनात कुठत बसायची ही सवय कशी लागते हो ?

**पु** : आगं त्याला पन आपनच केलेले कायदे आड येतात ना बये. कुठत बसायची ही सवयं आपल्या संस्कारानच लावून दिलेली आस्ते बग.

**स्त्री** : नवऱ्याचं म्हणणं पटलं नाही

**पु** : बसा कुठत.

**स्त्री** : सासू नणंदांच्या चुका सांगायच्या नाहीत.

**पु** : बसा. बसाना कुठत.

**स्त्री** : आपल्या संसाराच्या भल्याची स्वप्नं पहाण्याचा अधिकार आपल्याला नाही. कारण तशी स्वप्नं पहाण्यासाठी सगळेच तत्पर असतात.

**पु** : म्हणून कुठत बसायचं. बाईच्या जास्तीच्या मागन्याला लगाम घालायचा प्रयत्न केला तर.

**स्त्री** : तर संतापायचं नाही.

**पु** : न्हाय ना. संतापायचं नाही. फकस्त कासवागत पाय पोटात घेवून कुढत बसायचं.

(इथून दोघांचा टोन बदलतो.)

**स्त्री** : आमच्या अपेक्षा अवाजवी नसतातच.

**पु** : फकस्त पंख असलेल्या, आनं पाय नसलेल्या अपेक्षा अवाजवीच असतात.

**स्त्री** : असं तुम्हाला वाटतं.

**पु** : मंग खोट आस्तं का त्ये.

**स्त्री** : खरं, खोट ठरवण्याचा अधिकार फक्त तुम्हालाच कां ?

**पु** : आन खोटं ठरवन्याचा अधिकार फक्त आपल्याले असा तुमचा हेका का ?

(दिर्घ शांतता)

खरं काय, अन खोट काय, याच भुलभुलैयात फिरत रहायचं आन याच चमचे गिरीत आपल्या जिंदगीचं कडबोळं करून टाकायचं.

(शांतता)

**स्त्री** : आपल्याला काय हवं आहे, हे समजेपर्यंत बांबुच्या कामठ्यांवर जावून पडायची वेळ येते.

**पु** : न्हायतर मग अंगाला लकवा मारून घ्यायचा, आन भंगार बाजारातल्या कचऱ्यागत कोपऱ्यात पडून ऱ्हायचं.

**स्त्री** : हे सगळं बोलावसं वाटतं. अगदी मोठ्याने किंचाळून बोलावसं वाटतं.

**पु** : पन रडता बी येत न्हाई आन वरडता बी येत नाइ, म्हणून हे सम्दं करायचं. पन मनातल्या मनातं.

**स्त्री** : म्हणून मी खून केला. (शांतता)

(किंचाळून) हो..मी खून केला. माझ्या हातानं माझ्या निष्पाप मनाचा खून केला. आणि स्वत:ला गाडून घेतलं या अंधार कोठडी सारख्या तळघरात

(हळू हळू कोठडीत जावून बसते.)

माझ्याचं हातानं, एक एक चिरेबंदी दगड, रचत, रचत, रचलेली ही कोठडी. या कोठडीत खिडक्या नाहीत. दरवाजे नाहीत. मन जिवंत राह नये म्हणून बाहेरच्या हवेलाही बंदी घातली आणि मग इथल्या गहीऱ्या काळोखात अन कोंदट वातावरणात माझं मन हळूहळू कोमेजत गेलं सुकत गेलं. आणि एक दिवस मरून गेलं. म्हणजे मी माझ्या हातानं माझ्या मनाचा खूनच केला. नाही कां आता बाहेर जे चालत, फिरत असतं, ते माझं प्रेत असतं. मनाचा जळून कोळसा झालेलं. चालतं बोलतं, जिवंत प्रेत. पण त्रास होतो. फार फार त्रास होतो. सगळं काही जागच्या जागी असून सुध्दा, आतून पोकळपणा जाणवत रहातो आणि तरीही हे फोलपटाचं जिणं जगावं लागतं. नवरा, सासू, नणंदा, मुलं यांच्यासाठी. –– पण मेलं मन सुध्दा अमरत्वाचा पट्टा घेवून आल्यासारखं आपला पाठपुरावा करत रहातं.त्याला तुम्ही जाळा, पुरा, किंवा तळघरात डांबून ठेवा. एखाद्या दिवशी, एखाद्या हलक्याशा झुळुकीने याला कोंब फुटतो. आणि मग त्या कोंबाला नष्ट करण्यासाठी या कोठडीत येवून बसायचं. त्या

कोंबाला ढेच, ढेच, ढेचायचं आणि निर्जीव झालेल्या त्या कोंबांकडे हताषपणे पहात बसायचं.-- जड जातं. हा पराभव पचवणं जड जातं. म्हणून या कोठडीत येवून मी रडत बसते. (तिला रडायला येवू लागलं आहे. पुरुष आतमध्ये येतो.)

**पु** : हा पराभव का फक्त बाईचाच असतो बये ? आगं, आपल्या मतीला गाडून टाकन्याचं कामं पुरुषपन करत अस्तो बग. वैशाखवणवा पेटल्यागत हा भडका जवा उडतो ना, त्यात हे बाईचं मन, हे पुरुषाचं मन असा भेदभाव न्हात नाही. मनाचे हे भोग भोगल्यावाचून, बाइ आन बाप्याची सुटका नसते. मग आपनचं आपल्या कोठडीवर पहारा घेत न्हायचा.कुठल्याही झाडावर, त्यो अमरवेलीचा तुकडा फेकला, तर तो जसा कोंबारा धरतुना, तसा कोंबारा आमच्या मतीत बी फुलतो बग, आन मग तू म्हंते तसं त्याला ढ्येच ढ्येच ढ्येचायच. तरास व्हतो. तू म्हंते तसा पुरुषाला पन तरास व्हंतो गं. आन मंग अशा येळेला आपल्या वरचा पहारा हलवायचा, पावशेर प्वाटात ढकलायची, आन या कोठडीत येवून रडत बसायचं. आपल्याच मनाचा खून क्येल्या गत रडत बसायचं.

(त्यालाही आता रडायला येवू लगले आहे. दोघांचे ते भेसूर, अभ्रद रडणे वाढत असतांना अंधार.)

(पडदा)

---

# २) अभ्यागत

(माध्यम वर्गीय टू रूम किचनचे घर रात्रीचे १०/१०:३० वाजलेले मागे एका कोपऱ्यात एक कॉट तिच्यावर ७०/७५ वयाची एक व्यक्ती. हिला दम्याचा त्रास आहे. खोकल्याच्या ढासे व्यतीरिक्त हिला संवाद नाही. खोकल्यातून तिचे अस्तीत्व जाणवते परंतु खोकल्याचा अतिरेक टाळावा.

यानंतर घरातल्या व्यक्ती

माई ७०, सुषमा– ४५, नेहा –३२/ बबा –१८ /२० अशा वयो मर्यादेची. सगळयांची रया गेलेली.

पडदा उघडतो तेंव्हा माई कुढल्या तरी फोटो समोर निरंजन लावून जयमाळ ओढत बसलेल्या. सुषमा त्या आजोंबांना कसलेसे चाटण चाटवते, पाणी देते, व्यवस्थीत झोपून पांखरुण सारखे करते.

नेहा भिंतीला टेकवून ठेवलेल्या वळकटीवर डोक हातात धरुन बसलेली.)

(बबा मागच्या गॅलरी मधून काही चाहूल घेण्याचा प्रयत्न करते. मग तोच प्रकार दरवाजा आणि खिडक्यांच्या फ्टीतून. लांबवरुन कुत्र्यांचे तुटक तुटक भुकंणे –मधेच एखादी भुंकण्याची फैऱ्याच्या फैर. सुषमा विनाकारण एखादे काम करुन टाकल्या सारखे करत.)

**सुषमा :** (विरक्त आवाज) बब्या बैस बरं शांत काही कोणी येत नाही. रिकाम टेकडे उदयोग असतात हे.

**बबा :** असं कसं म्हणतेस आई. (आवाज उतरवून) आज रात्री १० ते १२ पर्यंत, असं स्पष्ट लिहीलं आहे.

**माई :** आगो पण नांव आहे का खाली, नुसतं पाहुणा म्हणून सही केलीय मेल्याने.

**नेहा :** मला तर वाटतंय, यांच्या बद्दल काहीतरी माहिती मिळाली असेल

**बबा :** (तिचं वाक्यं पूर्ण करित ) आणि ती सांगायची म्हणून गुप्त पणे यायचं, म्हणून पाहूणा अशी सही केली असेल.

**सुषमा :** इथे आपलंच जगणं चोरा सारख झालंय. तो पाहूणा काय दिवे लावणार आणखीन ?

**नेहा :** पण वाट तर पाहाविच लागणार ना ?

**सुषमा :** ती तरं पहातोच आहोत ना बये आपण. आता दोन दिवसा पुर्वी हे पत्रं आलय, म्हणून काळजाला डोळे फुटताय..... (डबडबून येते) एका दिवसांत माझं तर होत्याचं नव्हतं झालं. तुझ्या वाटेला तरी तो

भोग येवू नाही.

**नेहा :** (भरुन येत ) वहिनी.. कसं होइल हो माझं ( मुसमुसते )

**बबा :** (तिला सावरत, खोटया उत्साहात.) काही नाही गं सगळं सगळ सगळ व्यवस्थित होईल.ठाणकन भुतासारखा रमेशदादा येऊन उभा राहील, आणि आईला विचारेल भाऊ कुढय माझा. (चाचपते.)

**सुषमा :** बबा... (हुदके देवू लागते. फारसा आवाज नाही. पण तिव्रता जाणवावी.)

(गोरी मोरी होवून आई जवळ सरकते. कसाविस होवून )

**बबा** : सवईने तोंडात आलंग् आई. मला माफ कर नं. (दाबून धरलेले हुंदके मोकळे करुन देत तिच्या कुशीत मान लपवते.)

**माई** – (स्वःत डोळे टिपत ) सवईने निघंतं गं बाई तोंडातून. आता तू पण रडू नकोस. सूनबाई.. आवर तिला (खाटेवरची वयस्क व्यक्ती उढून बसते.काय झालं विचारु लागते ढास सुरु (उठतातं) काही नाही तुम्ही पडून राहा बरं (त्या तिघींना ) आवरा गं पोरींनो.नेहा, जेवणं आटोपली कागं तुमची ?

(तेवढयात दारावर १–२ थापा मारल्याचा आवाज, सगळे एकदम अलर्ट तिघी आपपल्या ढिकाणी उभ्या राहतात. बबा सावधपणे दरवज्या जवळ जाते. हिंमत करुन दार उघडते. वातावरणातं ताण. बाहेर कोणीच नाही.पुन्हा दार लावून सुटल्या सारखी वळते.)

**बबा** : गेल्या आढवडया पासून पाचव्यां का सहाव्यांदा होतंय असं जीव टांगणीला लावून दार उघडावं, तर समोर सगळं शुकशुकाट .

**नेहा** : (फिकटपणे ) कोणी तरी वात्रट कारटी असतील

**माई** : पण मग पायांचा रव नको यायला.

**सुषमा** : माई अहो. वाऱ्यानं किंवा आदळत असेल किं भास होत असतील आपणच दाराकडे डोळे लावून बसलेय

**माई** : असेल बाई तसंही असेल मला पण भास होतात रमेश अन तात्या नेहेमी सारखे ग्यॅलरीत गप्पा मारत बसलेत म्हणून.

**सुषमा** : (निश्वास सोडून ) यांच तर संपल सगळं देवाची इच्छा झाली, त्याने आपल्या जवळ बोलवून घेतलं पण रमेश भावजींचं तसं नाही. भाजी आणायला म्हणून बाहेर पडले तर आज दहा दिवस झाले पत्ता नाही. जीव नुसता टांगुन बसलाय. (नेहाचा डोळयांना पदर )

**माई** : तो देव पण नुसती परिक्षा पहातोय मेला (त्राग्याने) काय ती बरी, वाइट बातमी, आणून पोहचव म्हणा. आन सोडव, या त्राग्यातून

(नेहाला अस्फुट हुंदका.)

**बबा** : (किंचीत रागवून ) आजी काय बोलतेस तू हे (नेहाला थोपटत) काकूला कसं वाटेल. हे, असलं बोलणं एकून? (विराम.)

**माई** : (काकुळतीने.) होय गं. खरंय बबे तुझं. पण सततच्या काळजीने माझा पण जीव थकून जातो गंत्यातून हे म्हातारं वय. मेंदूचा आणि तोंडाचा धरबंद सुटून जातो बघ. नेहा इकडं ये पोरी ( ती जाते . तिला थोपटंत आपल्या शेजारी बसवते) माझ्या मनात काही वेडंवाकडं नव्हतं बरं पोरी. अग माझा तर पोरगाच आहे ना तो ? पण मोठा गेला, हिचं असं झालं.त्य संकटातून सावरत नाही , तो, रमेश बेपत्ता झाला. तुमच्या जीवाची काहीली पाहून, माझं मन थाऱ्यावर राहत नाह बये.(आजीजीच्या स्वरात ) चुकलं माझं. माफ करशील ना मला ? (नेहा त्यांच्या मांडीवर डोके ढेवून अस्फुट हुंदके देत राहते.) (विराम) (त्राग्याने.) प्लेगाच्या साथी सारखं हे दगलीचं लोण कसं पसरतय कोण जाणे त्यांच्या घराला

अशी आग लागेल तेंव्हा शांत होतील कुत्रे.

(विराम. ढास म्हताऱ्याची.)

**सुषमा–मा**ई, आता त्रागा करुन , आपल्यालाच त्रास करुन घेण्यात अर्थ नाही, शांत राहयचं, आणि जे होइल ते पहायचं बबे तू अन् माई दोघांनी खाऊन घ्या थोंडं

**बबा–** आणि तुम्ही ?

**सुषमा**–तुम्ही येइतों अण्णा आणि दाराकडे लक्ष ढेवतो आम्ही (त्या आत जातात.)

**नेहा** : (सुषमा जवळ येवून बसत ) वहिनी, हे कसलं अरिष्ट लागलंय हो आपल्या मागे ? तात्या भाउजी गेलेत. यांचं असं झालं...

**सुषमा :** वेडी आहेस का नेहा तू ? दंगल उसळ्ली, त्यात हे गेले आपण त्यांना स्मशानात ढेवून आलो. (भकासपणे) पुन्हा दंगल उसकली तेंव्हापासून रमेश भावजी बेपत्ता पुन्हा १० दिवसात ८ वेळा पोलीस स्टेशनला जावून आलो. प्रत्येक खेपेला पोलीस सांगतायत, बेपत्ता व्यक्तींचा शोध घेणे चालू आहे म्हणून.याचा अर्थ लक्षात येतोस का तुझ्या? बेपत्ता म्हणजे – माझ्या सारखं तुझं होणार नाही. सापडत नाही एवढंच. आणि हे भोग का फक्त आपल्याच वाटयाला आलेत पोरी ? शहरातील शेकडों घर या आगीत होरपळताय बघ. जसं त्यांच, तसं आपलं. आता धिर सोडायचा नाही फक्त वाट बघायची. (विराम)

**नेहा** : अन मग, ते कुढून आलं असेल ?

**सुषमा :** न कळून काय कुढून आलं असेल

**नेहा** : परवा आलेलं ते पत्रं आज रात्री १० ते १२ पर्यंत येतोय. वाट बघा तुमचा पाहूणा ते पत्रं

**सुषमा :** ते कसं सांगु बाई मी? पण मला आपलं वाटतंय, भावजींना कोणीतरी पकडून ठेवलं असेल. ते सांगायला येणार असेल कदाचीत

**नेहा** : दचकून म्हंजे, पैसे बिसे मागतील का ते ? एक तर आपणच असे...

**सुषमा** : (सावरत) अगं अशा वेळी ते निरोप वाढवतात चिठ्ठया पाठवतात.

**नेहा** : मग आता आलेला पाहूणा, असाच निरोप किंवा चिट्टी घेवून आला तर ?

**सुषमा :** (अवसान गळालेल पण तरी) मला नाही बाई तसं वाटंत अग आहेच काय आपल्याकडे दयायला ? (त्वेशाने)

माझं कुंकु तर खालच मेल्यांनी आता का म्हणावं आम्हाला खातां ? (शांत होत.) पण तू काळजी करु नकोस . तो पाहूणा काय म्हणतो ते बघु. नंतर ठरवू.वाटेल ते झालं तरी रमेश भाउजींना घरी आणू आपण. (वहिनी, वहिनी म्हणत नेहा मुसमुसायला लागते. सुषमा तिला समजावते. दरवाज्यावर खडखड दोघी दरवाज्याकडे बघतात. भास असेल अस समजून एकमेकिंना समजून घेतात...पुन्हा खडखड......आता मात्र हा भास नाही याची दोघींना खात्री पटते. दोघी टेन्स अलर्ट पुन्हा अंदाज घेत आहेत.....काही क्षण ताणलेली

स्तब्धता दोघी निश्चल मुद्रेने दरवाजाकडे पाहत आहेत पुन्हा खडखळट...... आता मात्र प्रचंड जोरात. पाठोपाठ आरोळी घरात हाय का कुनी ?...)

(दोघी दचकुन भानावर येतात. आतल्या दरवाज्यात बबा खरकटया हाताने उभी )

**बबा** : आई... दार उघड कोणीतरी आलंय

(सुषमा स्वतःला सावरत दार उघडते समोर पोलीस)

**सुषमा** : (कशीबशी) या नं. आत या.

(पोलीस आत येतो. खिशातून एक कागद काढतो सुषमाला देतो.)

**पोलीस:** हा पत्ता तुमचाच ?

(ती कागद घेते वाचते तो पर्यंत पोलीसी पध्दतीचे निरीक्षण उभ्या उभ्या. )

**सुषमा** : हो... आमचाच ... बसा नं.

**पोलीस** : टैम ने. फकस्त पत्ता कन्फर्म करायला आलो हुतो.

**सुषमा** : (चाचरत ) म्हणजे, आमच्या रमेश भावजींचा तपास लागला ?

**पोलीस** : कोन रमेश भौजी ?

**सुषमा** : आमच्या नेहाचे यजमान ... म्हणजे मिस्टर.

**पोलीस** : तिचा कार्य सबंध ?

**सुषमा** : मग तुम्ही कशासाटी आलात ?

**पोलीस** : हा पत्ता तुमचाच हाय ?

**सुषमा** : हो

**पोलीस** : दोन दिवसांपूर्वी तुमाला येक लेटर आलं हाये ?

**सुषमा** : पण त्या त्यांच्याशी तुमचा काय संबंध ?

**पोलीस** : नो कन्वेशन फकस्त उत्तर दयायचं ( स्तब्धना ) तर लेटर आलं हाये ?

**सुषमा** : हो.

**पोलीस** : त्यात असं लिवलय, का, आज तुमच्याकडे कोनीतरी पावना येनार है. बरु बर?

**नेहा** : (आवेगात पुढे घेत ) मग ह्यांच्या बद्दलच सांगायला आलत ना तुम्ही ?

**पोलीस:** कोन हे ?

**नेहा** : माझे मिस्टर

**पोलीस** : म्हणजे बेपत्ता असलेले ?

**नेहा** : हो

**पोलीस:** न्हाय बा.

**सुषमा** : मग कशासाठी आलात तुम्ही ?

**पोलीस:** आमच्या चौकीत  येक अर्ज दिला गेला, का आमच्या कडं येक  पाव्हना येनार है. तरी आमच्या घराकडे लक्ष ठेवावे (कागद पुढे करत) आन पत्ता हा.

( स्तब्धता. नेहा / सुषमा गोंधलेल्या.)

**सुषमा :** अहो, पण आम्ही असा अर्जंच दिला नाही.

**बबा** : (पुढे होत.) आई ... मी दिला होता.

**सुषमा** : (धक्का बसून ) बबा तू ?

**बबा** : हो आई...

**सुषमा** : अंग पण का ? अन मला न सांगता ?

( माई आलेल्या)

**माई** : मीच सांगीतलं होतं तिला

**सुषमा** : अहो माई, पण ...

**बबा** : (समजावत ) आई , असा अर्ज दयायला तुम्ही दोघींनी नाही  म्हटल असतं याची खात्री होती आम्हाला.म्हणून

तुम्हाला          कळू न देता अर्ज दिला .

**सुषमा** : (त्राग्याने ) अगं पण कशासाठी ?

**माई** : हे बघ सूनबाई गावात हे असं दंगलीच वातावरण पसरलेलं. येणारा पाहुणा कोण, आपण  त्याला  ओळखत नाही. एखादा दहशतवादी किंवा अतिरेकी असला तर ऐनवेळी काय करशील?

**पोलीस** : (पुढाकार घेत) म्हतारी सांगतेय ते बरुबंर हाय. आन आमचा तुमाला काइपन तरास व्हनार न्हाई. अश्या शमशया सोडवन्या साठीच शासनान आमच पेशल स्कवाड निर्मान केलंय आमी हितंच आजुबाजुला कोंन्त्यातरी गल्लीत फिरत ऱ्हावू. या घराशी आमचा संबंध हाये असं अजाबात लक्षात येनार  न्हाई– थोडक्यात        सांगायचं तर, असून नसल्यागत आमची भुमीका आस्ते (खिशातून एक शिटी काढून देतो.) हे घ्या  ही शिटी तुमच्यधाकडं हानुंदया कोनी आलं, काई दगा फुटका वाटला तर शिटी फुक्रायची, म्हणजे आम्ही सावद हावू. अशा खास केसेस साठी शासनाने या शित्यांचा पुरवठा केलांय

(बबा घेते. फुंकते. ती वाजत नाही.)

**बबा** : (गोंधळून )अहो, पण ही तर वाजत नाहीय.

**पोलीस** : म्हनूनच त्या पेशल हायत त्यांचा अवाज व्हत न्हाइत

**बबा** : पण मग याचा फायदा काय?

**पोलीस:** याचे दोन फायदे हाइत. पहीला, आन महत्वाचा महंजे शासन आपल्यासाठी कायतरी करते, याची तुम्हाला

जानीव व्हते. आन, दुसरा, त्याच्या पेक्षा महत्वाचा, फायदा म्हजे तुमचा आवाज शासना पर्यंत पोचत नाय. म्हजे, नागरीकांच समाधान, नागरिक सुकात शासनाचं समाधान शासन सुकात परस्परांनी समाधानात व्हांव याची गुरु किल्ली हाय ही.म्हजे, तुमाला अवाज फुंकायंच स्वातंत्र्य. आन त्ये अवाज कानी पडू न्हाई, अशी नेम्मन यवस्था. तवा सुकात राहा. काइ वाटलंच तर शिटी फुंका आमी हाओतच.येतो

मी. (जातो स्वतः दार लावून काही क्षणानंतर दाराची खडखड शांतता कोणीही दार उघडत नाही. पण चाहूल घेत आहेतच)

**माई** : बबे कोणी आलय वाटतं

**नेहा** : ( कर्कश्श ओरडून, दरवाजा उघडते ) काही कोणी आलेलं नाहीये. (पुन्हा ओरडते किंचीत हिस्टेरिक झाल्या सारखी ) या कोण येतंय ? तुमच्या स्वागताला आरत्या लावल्या आहेत. या येतय का कोणी ?(सगळे अवाक झालेले सहजगत्या ती सुषमा जवळ पोहचली आहे.) हे पण कुठं तडफडलेत समजत नाही.

मरुन बिरुन पडले असतील तर घरी या म्हणावं.आम्ही नेवून टकतो मसणात. म्हंजे तुम्ही पण सुटाल, अन या टांगणीतून आम्ही पण सुटू.

(आता मात्रं बांध फुटलेला हमसा हमशी रडत सुषमाच्या पायाजवळ कोसळते. प्रचंड स्तब्धता बबा दार लावायला निघते.) दार नको लावूस बबे. दार उघडं रहूदे. कोण पाहूणा येणार असेल, तर त्याच्या साठी दार उघडंच राहू दे.

**माई** : (तिला भानावर आणत ) पिसं लांगलय का तुला ? काय वाटेल ते बरळत सुटीलीयस बाहेरच्या कालव्याने जीव आधीच घाबरा झालाय आपला त्यात जर तुम्ही अशा सारख्या भेदरुन पडाल तं मग आमच्या सारख्यांनी काय करायचं ? शांत हो. अजीबात रडायचं नाही शांत हो सांगते ना मी. बबे तू दार लाव (बबा दार लावते.) आता अर्धी रात्र होत आलेली बाहेर असं सटवाईचं

वातावरण घरात आपण सगळया बायका मदतीला हाक मारायची तर, ओ दयायला कुणी नाही.अशा वेळी दार उघडं टाकून, आपणंच अरिष्टाला आवतण दयायचं का?

**नेहा** : नको नको ते भुंगे डोक्यात थयथय करीत फिरत आहेत माई हि घुसमट कशी दाबून ठेवू सांगा ?

**माई** : तुझं मन कळतंय गं पोरी मला पण कसल्या तरी अभद्र झाकोळानं झाकून घातलंय या गावाला (सुस्करतीत.)

पण फिटेल बरं हे मळभ कुठेतरी सुर्यप्रकाश असेलच ना

(दरवाजा वर खडखड सगळे पुन्हा अलार्मंड अलर्ट पुन्हा खडखड. बबा दार उघडते बाहेरुन एक व्यक्ती येते. प्रौढ

सुसंस्कृत ,समजंसपणे बोलते.)

**व्यक्ती** : (एक चिठ्ठी काढून बबाला देतो.) नमस्कार हा पत्ता इथलाच आहे?

**बबा** : (वाचून ) हो आमचाच आहे आपण?

**व्यक्ती** : मी आत येवून सांगतो. (आत येतो. एका खुर्चीवर बसून घेतो .) मी बसून बोललं तर तुमची हरकत नसेल.

**सुषमा** : अहो पण तुम्ही आहात कोण ?

**व्यक्ती** : सांगतो पण आधी ते दार लावून घ्या. सध्या जे वातावरण आहे, त्या दृष्टीने ते सुरक्षीत होइल,. (बबा यांत्रीकपणे दार लावते. ) गुड आता, मी कोण, माझं नाव काय, मी काय करतो या तपशीलात न शिरता आपण महत्वाच्या मुद्दयांवरच बोलुया.माझ्या माहिती प्रमाणे साधरण २/३ दिवसांपूर्वी तुम्हाला एक पत्रं आलेलं असेल. ज्या मधे आजच्या तारखेला रात्री १० ते १२ वाजेच्या दरम्यान तुमच्या कडे एक व्यक्ती येणार असं कळवलेलं असेल.शेवटी कोण येणार, त्याचं नाव काय असं न कळवता खाली फक्त पाहूणा अशी सही केलेली असेल.

**माई** : म्हणजे :

**व्यक्ती** : हो तो पाहूणा म्हणजे मीच

**सुषमा** : (किंचीत आवज चढवत ) मग खाली नावं गांव लिहायला काय झालं होत ?

**व्यक्ती** : तशी आम्हाला परवानगी नाही आणि मला असं वाटतं आपण सगळयांनी शांततेनं बोलणं योग्य होईल कारण आपल्याला जी चर्चा करायची आहे, ती जर शांततेत झाली तर जास्त चांगला

**सुषमा** : अहो पण कशा बद्दल चर्चा?

**बबा** : (पुढे येत ) आणि तुम्ही आहात कोण ?

**व्यक्ती** : (सुषमाला ) यां नंतर आपलं जे बोलणं होइल त्याला आपण चर्चा म्हणू या. (बबाला ) आणि मी कोण, हे सांगयची आम्हाला परवानगी नाही.

**बबा** : (त्याच तिव्रतेने ) कोणाची परवानगी नाही?

**व्यक्ती** : (समजूतदारपणे) शांतता. पुन्हा शांतता. ज्यांनी मला इथ पाठवलं त्यांची परवानगी नाही.

**बबा** : मग ते आहेत तरी कोण?आणि त्यांनी तुम्हाला का पाठवलं.?

**व्यक्ती** : ( शांततेत ) सांगतो. मला इथं माझ्या वरिष्ठ अधिकाऱ्यांनी पाठवलं. मला इथं पाठवायला, त्यांना, त्यांच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांनी सांगीतल असेल आणि त्यांना त्यांच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांनी अशा पध्दतीने आदेश देणारी एक यंत्रणा असते आणि आम्ही कर्मचारी त्या यंत्रणेच्या साखळीचा एक भाग असतो.

**सुषमा** : (गोंधळ वाढत चाललाय.) अहो पण कसची यंत्रणा ? तिचा आमच्याशी काय संबंध

**व्यक्ती** : प्रत्येक जिवंत किंवा मृत व्यक्तीशी या यंत्रणेचा संबधं असतो. आता नावंच दयायचं असेल तर मग, आपण यंत्रणा म्हणू, नियंत्रण म्हणू किंवा शासन म्हणूया.

**माई** : कोणत्या शासना बद्दल बोलताय तुम्ही?

**व्यक्ती** : आपलं शासन जे आपण चालवतो.

**माई** : (उपरोधान) आपण चालवतो. इथं घर चालवणं होत नाही आमच्याकडनं अन शासन चालवायला सांगताय?

**व्यक्ती** : ठिक आहे मग जे आपल्याला चालवत त्याला आपण शासन म्हणू

**बबा** : (त्याला समाजवत, स्तःवर कंट्रोल करित .) हे बघा, प्लिज,आमचा गोंधळ वाढवू नका. आधीच आम्ही आमच्या परिस्थीतत अडकल आहोत तुम्हाला काय सांगयचं ते निट सांगा. तुम्ही रमेश कांका बद्दल सांगायला आलात का.?

**व्यक्ती** : (प्रश्नार्थक होत ) कोण रमेश काका ? ते तर दंगलीत मारले गेले नं.?

(स्तब्धता)

**माई** : (हंबरडा फोडून ) म्हजे ? रमेश पण गेला ? देवारे ...

**नेहा** : ( विस्कारलेल्या डोळयांनी ऐकते आहे. बधीर झालेली) कोणी मारलं? केंव्हा अन त्यांच शरीर कुढाय (तिचा तोल जावू लागलाय )

**सुषमा** : (तिला आवरत) नेहा नेहा भानावर ये. आजीबात गोंधळ करायचा नाही.

**बबा** : काकू ... काही होणार नाही रमेश काकांना ...

(तिला समजवतांना सगळयांनाच रडणे अनावर झालेले )

**नेहा** : (फुटते) अहो मला सोडून कुढं गेला हो...

(आता सगळया एकमेकींच्या मिठीत .रडणे सुरु आहे. मागची व्यक्ती उठून बसते ढास टाकत रडत राहते.

व्यक्ती अस्वथ झालेली आहे. काही आठवून हँाडबॅग मधून डायरी काढते.)

**व्यक्ती** : (त्यांना शांत करित ) एक मिनीट. मला वाटतं, तुमचा आणि माझा थोडासा गोंघळ झालय. या घरातील रेशनकार्डवर ३ पुरुष आणि ४ स्त्रिया अशी नोंद आहे. बरोबर? त्या तीन पुरूषांपैकी एकजण दोन महीन्यापूर्वी उसळलेल्या दंगलीत मारला गेला.

**सुषमा** : ( सावरत ) हो माझे मिस्टर होते ते.

**व्यक्ती** : ( प्रश्नार्थक ) मग ते दंगली मधे मारले गेले हे तुम्हाला माहीत नव्हतं ?

**सुषमा** : माहीत होतं त्यांच सगळं क्रियाकर्म आम्हीच केलं ना.

**व्यक्ती** : मग माझ्या लक्षात येत नाहीय,की सगळं माहित असतांना दोन महिन्यांपूर्वी मयत झालेल्या व्यक्ती बद्दल तुम्ही

आता का शोक करीत आहात.

**बबा** : आम्ही आमच्या कांकासाठी रडतोय.

**व्यक्ती** : तुमचे काका म्हणजे?

**बबा** : माझ्या काकूचे मिस्टर. रमेश काका

**व्यक्ती** : एक मिनीट हं (पुन्हा डायरी चाळून) घरातील ३ पुरुषांपैकी, एक विकलंग आहे, दुसरा मारला गेला आहे आणि तिसरा बेपत्ता आहे. बरोबर?

**नेहा** : पण तुम्ही आताच सांगीतलं ना की माझा नवरा गेला म्हणून ?

**व्यक्ती** : (गोंधळून) मी कुढं सांगीतलं तुमचा नवरा मेला असं मी फक्त एवढंच सांगीतलं की या घरातील, तीन पुरुषांपैकी एक व्यक्ती जिवंत आहे, एक मारली गेली आहे आणि तिसरी बेपत्ता आहे.

**सुषमा** : मारली गेलेली व्यक्ती म्हणजे माझा नवरा.

**माई** : जिवंत असलले आमचे हे ... ( म्हताऱ्याची ढास )

**नेहा** : आणि बेपत्ता असलेला माझा नवरा...

( पुन्हा ढास क्षणभर स्तब्दता.)

**व्यक्ती** : I am sorry.माझ्या कडून चुकीचं नांव उच्चारल गेल, आणि तुमचा गैरसमज झाला खरं तर या घरातील

एक व्यक्ती गेलेली आहे. अशा हेतूने ते नांव उच्चारलं गेल. पण ते नाव चुकीच होत, मला माफ करा.

**नेहा** : अहो पण माझ्या ह्यांच काय ?

**व्यक्ती** : म्हणजे ते बेपत्ता असलेले नं.?

**नेहा** : हो

**व्यक्ती** : त्यांचा शोध सुरु असेल. सापडतील ते.

**माई** : सापडतील. पण कसे ? जिवंत का मेलेले ?

(स्तब्धता.)

**व्यक्ती** : या संदर्भात मी तरी काहीच सांगु शकणार नाही. कारण त्यासाठी वेगळी यंत्रणा आहे. बबा (तिव्र होत ) मग तुम्ही आलात कशासाठी ?

**व्यक्ती** : (सौम्यपणे ) चर्चेसाठी मी आधीच सांगीतलं होतं

**सुषमा** : कसली चर्चा ?

**व्यक्ती** : हं हा खरा मुद्दा आहे. पण त्याला सुरुवात करण्यापूर्वी मला एक ग्लासभर पाणी मिळेल?

**माई** : बबे ... त्यांना पाणी पाज माठभर (बबा निघते )

**व्यक्ती** : (हसून) माठभर नको .ग्लासभर पुरे खरं तर अर्धाच ग्लास पण पुन्हा लागलं, तर असावं म्हणून ग्लासभर सांगीतल पाण्याची सुध्दा टंचाई आहे ना, आजकल म्हणून पाणी जपून वापरा अशी आपली यंत्रणा सांगते. आपण तसं वागायचं

**माई** : पाणी जपून वापरायला सांगते तुमची यंत्रणा मग माणसं जपून मारायची, असं का नाही सांगत

**व्यक्ती** : जपून मारायची म्हणजे कशी?

**माई** : (तळमळून)माझ्या तात्याला भर बाजारात पेटवून दिल. सरणावर टाकायच्या आधीच कोळसा करुन टाकला

मेल्यांनी.

**व्यक्ती** : आय सी म्हणजे कोळसा न करता, दूसऱ्या पध्दतीनं मारलेलं चालल असतं आपल्याला ?

**माई** : (सुषमाला ) अंग हा नालयक काय बोलतोय

**सुषमा** : (माईना) तुम्ही शांत रहा. (बबा पाणी घेवून येते. त्याला देते.)

**व्यक्ती** : थँक्स .. (सावकाश एक एक घोट पितो.)

**सुषमा** : आता तुम्ही विचारलेल्या प्रश्नावर मी एक प्रश्न विचारते, या अशा दंगलीत, तुमचं प्रेत कुढल्या अवस्थेत

आणलेलं, तुमच्या बायकोला आवडलं असतं

**व्यक्ती** : सॉरी याबाबत मी काही सांगु शकत नाही. कारण यंत्रणेमधे काम करणाऱ्यांना नाते संबंध जोपसता येत नाही. या बाबत यंत्रणेचा नियम भगवत गिते सारखा आहे. त्यामुळे उदया माझ्या बाबत सुध्दा असं काही घडलं तर ते, असं घडू शकतं, अशा विचारांची योजना यंत्रणे जवळ असते.

**बबा** : (उपहासाने) मग अशा पध्दतीच्या घटना घडूच नाही, याची योजना तुमच्या यंत्रणे जवळ नसते का?

**व्यक्ती** : (उसासून) तशा योजना यंत्रणे जवळ आहेत पण दुर्देवाने त्या आमलात आणता येत नाही.

**बबा** : का नाही अमलात आणता येत .

**व्यक्ती** : असं आहे बघा, यंत्रणा उभी असते नागरीकांच्या जीवावर.जीवावर इन द सेन्स भरवश्यावर विश्वासावर.

**सुषमा** : पण हे सगळं घडत असतांना आमचा विश्वास आणि भरवसा कसा टिकेल?

**व्यक्ती** : हिच मधली खरी गोम आहे.एक लक्षात घ्या यंत्रणा जर स्थिर ठेवायची असेल तर जनजीवन अस्थीर असण

अत्यंत महत्वाचं असतं कारण भयभित हवालदील समाजच यंत्रणेवर विश्वास ठेवेल अशी यंत्रणेची धारणा आहे.( मागे दम्याची प्रचंड ढास नेहा सुषमा त्यांना सावरतात.) काय झालय यांना ?

**माई** : (तिरस्काराने)तुमच्या यंत्रणेचे मुकबळी आहेत ते

**व्यक्ती** : (इंटरेस्ट घेत, डायरीवर लिहीत.) आय सी. हा एक आणखीन इंटरेस्टींग प्रकार दिसतोय. म्हणजे जाळपोळी,शेतक–यांची होळी, भुकबळी तसा हा नविन मुकबळी.(स्वतःशीच पुटपुटत)

इंटरेस्टींग व्हेरी इंटरेस्टींग बळी जाण्याचा हा आणखीन एक प्रकार असु शकतो हे यंत्रणेला कळवायला पाहीज (अचानक एक विशिष्ट संगीत वाजू लागले. ते जणू फक्त त्या व्यक्तीलाच ऐकू येते. बाहेर गॅलरीत जावून तो अवकाशात बोलतो. मोबाइल वर बोलल्या सारखा. परंतु त्याच्या जवळ मोबाइल नाही.)

**व्यक्ती** : हा. मी इथं पोहोचलोय. सध्या ते दुःखात आहेत म्हणून स्किम सांगितली नाही. चर्चा सुरु आहे. त्यातून मुक बळी हा नवीन प्रकार समजला. त्याची नोंद केली. आता फायनल स्किम समजवून मी निघतोच. (सुषमा आता सावरलेली)

**सुषमा** : कोणती स्किम सांगताय तुम्ही ?

**बबा** : (आवेगात पुढे होत) आणि रात्री अपरात्री तुम्हाला पाठवणाऱ्या कंपनीच नाव काय ?

**व्यक्ती** : यंत्रणा. आम्ही ज्यांच्या साठी काम करतो त्या, त्या पडदयाला तुम्ही काहीही नाव देवू शकता. पडदया आड जातांना आपण पाठवलेली व्यक्तीच तिथून बोलत असेल, याची शाश्वती नसते. त्यामुळे आम्ही फक्त मिळणाऱ्या आज्ञा ऐकत असतो आणि कारवाई करत असतो.या मधे माझ्यावर टाकण्यात आलेली जबाबदारी म्हणजे पाहूणा म्हणून तुमच्याकडे येणे आणि यंत्रणेने आखलेली अभीनव योजना समजावून सांगणे.

**माई** : काय घोळ घालतोय गं हा माणूस ?

**नेहा** : मला तर हा कुढला तरी एजंट वाटतोय आणि आपल्याला गंडवू पहातोय.

**माई** : गंडवायला आहेच काय आपल्या कडं ? (खाजगीत) आपणंच सगळे मिळून त्याला गंडवून टाकू

**व्यक्ती** : तर, एकंदर प्रकार बद्दल तुमचं मत काय आहे..?

**सुषमा** : कुठल्या प्रकार बद्दल ?

**व्यक्ती** : शहारामधे होणाऱ्या दंगली, होणारी जाळपोळ, मारली जाणारी माणसं या बाबत तुमचं मत काय आहे ? म्हणजे हे योग्य की अयोग्य की अयोग्य आहे ?

**सुषमा** : काही तरी मुर्खासारखं काय विचारता ? या गोष्टींना कोणीतरी चांगल म्हणेल का ?

**व्यक्ती** : एक्झॅक्टली पण मग जर या गोष्टी वाईट आहेत तर का घडतात.?

**बबा** : घडत नाहीत घडवून आणल्या जातात.

**व्यक्ती** : अगदी बरोबर. म्हणजे कोणती तरी यंत्रणा जमावाला या कारणांसाठी मोटीव्हेट करते. आणि तो होतो. आणि मग अशा पध्दतीची हिंसा घडून येते.

**सुषमा** : हे सांगण्यासाठी तुम्ही एवढया रात्रीचे आलात ?

**व्यक्ती** : नाही. पण याच प्रश्नावर चर्चा करण्यासाठी आलो आहे.

**बबा** : अहो पण ही चर्चा कशासाठी ? आमचा काय संबंध या चर्चेशी?

**व्यक्ती** : आहे प्रत्येक नागरीकाचा या चर्चेशी संबध आहे. म्हणजे असं बघा, कोणीतरी तुम्हाला सांगत की घरं जाळा तुम्ही जाळता, माणसं मारा. तुम्ही मारता, तर...

**बबा** : कोणीतरी म्हणजे तुमची यंत्रणाच नं.?

**व्यक्ती** : तसंही असू शकेल. प्रश्न असा आहे की, कोणाच्याही चिथावणीला बळी पडून,जमाव बिथरतो, हिंसा होते, त्यामुळे, हिंसा करण्याची ही प्रवृत्ती माणसांमधे का निर्माण होते याचा विचार करण्याची गरज तुम्हाला नाही वाटत?

**माई** : हिंसेची प्रवृत्ती माणसांमधे निर्माण होत नाही बाबा. ती मुळातच त्याचा जवळ असते.

**व्यक्ती** : अगदी बरोबर. मग हिंसा जर मुळातच असते, तर अहिंसा का नसावी?

**सुषमा** : पण ती असतेच म्हणून तर आपण सामन्य जिवन जगतो ना.

**बबा** : (इंटरेस्ट घेत ) पण एखादया वेळेला तो बांध फुटतो, आणि माणूस हिंसक बनतो.

**व्यक्ती** : एक्झॅक्टली  पण तो कायम हिंसक किंवा कायम अहिंसक का नाही राहू शकत ?

**सुषमा** : हे कसं शक्य आहे ? अशाने तर सगळंच विस्कळीत होवून जाईल.

**व्यक्ती** : आणि हाच प्रश्न यंत्रणेला पडला आहे. म्हणजे समजा हिंसाच  होत राहीली, सगळे संपले तर यंत्रणेची गरज भासणार नाही. किंवा सगळेच अहिंसक होवून आनंदात जगू लागले तरी यंत्रणेची गरज राहणार नाही. म्हणजे आता हा यंत्रणेच्या  अस्तीत्वाचा प्रश्न आला नाही का?

**बबा** : पण यंत्रणा निर्माण करायचीच कशाला ?

**व्यक्ती** : तो प्रश्न नाही. कारण यंत्रणा आपण निर्माण करत नसतो.ती एखादया स्वयंभू मूर्तीसारखी असते.

**नेहा** : (वैतांगून) मग तुमचा प्रश्न काय आहे ?  इकंडे आम्हाला प्रश्न पडलाय माझे हे सापडत नाहीत.

**व्यक्ती** : ते सापडणं किंवा न सापडणं याच्याशी यंत्रणेला कर्तव्य नाही. ते सापडले तर प्रश्नच नाही. आणि नाहीच सापडले तर काही रकमेचा धनादेश तुम्हाला दिला जाईल.

**सुषमा** : म्हणजे त्यांच्यानं आमच्या घराचं नुकसान भरुन निघेल म्हणता?

**व्यक्ती** : तुम्ही फक्त माझं , आमचं एवढाच विचार करताय आपल्या यंत्रणेचाही विचार करा.

**माई** : सुषमा त्यांच झालं असेल तर त्यांना निघायला सांग अर्धी रात्र झालीय. झोपा व्हायच्यात आमच्या यंत्रणेला नसले तरी आम्हाला शरीरधर्म आहेत म्हणावं. (स्तब्धता)

**व्यक्ती** : तुमची तशीच इच्छा असेल तर मला निघायला काहीच हरकत नाही. तुम्हाला जर काही त्रास झाला असेल तर

क्षमस्व. येतो मी. (जायला निघतो.)

**नेहा** : (भान सुटून ) थांबा, माझ्या नवऱ्याबद्दल काही नं सांगता कुढं  जाताय तुम्ही ?आधी माझा नवरा कुढाय ते

सांगा. कुढाय  माझा नवरा ?

**व्यक्ती** : त्या संदर्भात मला कल्पना नाही, हे मी मघाशीच सांगतलं

**नेहा** : (किंचाळून..) मग का इथं झक मारायला आला होतात ?

**व्यक्ती** : तुमचा काहीतरी  गैरसमज होतोय. एका विशीष्ट कामसाठी मी आलो होतो. पण तुम्ही मला जायला सांगताय. मग मी काय      करु?

**बबा** : थांबा. आणि सांगून टाका तुमचं विशीष्ट काम.

**सुषमा** : आणि सोडवा आम्हाला या टांगणीतून

(स्तब्धता )

**बबा** : सांगना काय आहे तुमचं काम ? (विराम ...)

**व्यक्ती** : चर्चा. यंत्रणे मार्फत चर्चा करायला आलोय तुमच्याशी.

**सुषमा** : (तिडीक) अहो पण कसली चर्चा ?

**व्यक्ती** : तुम्ही सगळे एक्साइट होताय. अर्थात तुमची मनस्थीती मी ओळखू शकतो. त्या मुळे असं होणं स्वाभाविक आहे, पण प्लीज, एक्साइटं होवू नका. शांतपणे बसून घ्या. आणि मी काय सांगतो त्यावर विचार करा.

**माई** : सुषमा त्यांना म्हणावं काय बोंबलायचं ते बोंबला आणि टळा इथून.

**सुषमा** : बोला लवकर.

**व्यक्ती** : तर, हिंसा आणि अहिंसा या सदर्भात आपण जे बोलत होतो...

**बबा** : डोकं फिरलंय का तुमचं ? काय तोच तो घोळ घालताय ?

**व्यक्ती** : (घाईत ) नाही घोळ घालत नाहीय. समजावून सांगण्याचा प्रयत्न करतोय. एक लक्षात घ्या. मी इथं यंत्रणेची महत्वाची योजना सांगयला आलोय. दुर्देवाने ते वातावरण इथं आधीच होतं.म्हणजे (सुषमाला) तुमचे यजमान मारले गेले. (नेहाला) आणि तुमचे बेपत्ता झाले. त्यामुळे योजना सांगून लगेच निघून जाणं मला प्रशस्त वाटत नव्हंत म्हणून तुमच्याशी अवांतर बोलत राहीलो.पण तेवढयात आजींनी जायला सांगीतलं म्हणून निघालो.

**सुषमा** : आता तरी बोलता का ?

**व्यक्ती** : (आता त्यांच बोलण एखादया सेल्समन सारख) येस. येस. आयेम कमींग टू द पॉइंट. (विराम.) तर हिंसा, हिंसाचार यासाठी हे तुमच्यावर आक्रमण करतात. (डावा पंजा समोर आणतो.) आणि त्याला हे प्रती उत्तर देतात. (उजवा पंजा समोर आणतो.) त्याचे दोन्ही पंजे समोर समोर .म्हणजे हे सतत समोर असले तर संघर्ष होणार.मग हा संघर्ष टाळण्यासाठी समजा हे नाहीसे झाले, एक पंजा खाली करतो. दुसरा वर करत) तर हे कोणावर आक्रमण करतील ? त्यांना आक्रमण करताच येणार नाही. कारण समोर आक्रमणासाठी कोणीच असणार नाही. म्हणजे नंतर त्यांची हिंसा अहींसे मधे बदलायला सुरु होईल. कारण ज्यांना मारायचं,तेच नाहीत. मग मारयचं कुणाला? म्हणजे अहिंसेची सुरुवात झाली. बरोबर ?

**बबा** : (पंजा दाखवत .)पण हे नाहीसे कसे होतील ?

**व्यक्ती** : (उत्साहात.)तीच तर योजना आहे. (पंजा दाखवत) ह्यांच्या साठी कुढंतरी लांबवर भुमिगत शहरं बांधायची. त्या शहरामधे कुढल्याही नागरी सुखसुविधा पुरवल्या जाणार नाहीत. यंत्रणे मार्फेत दोन वेळचं अन्न शिजवून पूरवलं जाईल. त्यानंतर टप्याटप्याने ते अर्धकच्यं करून नंतर शेवटी पूर्ण कच्चं अन्न दिलं जाईल.

**बबा** : (गोंधळलेली ) म्हणजे काय होईल?

**व्यक्ती** : त्यामुळे एका जमातीचा आदीमानवाकडे प्रवास सुरु होइल.

**सुषमा** : आणि त्याच्या नंतर ?

**व्यक्ती** : तो पर्यंत तुमच्या नगरावर आक्रमण करणारी जमात अहिंसक झालेली, असेल.

**बबा** : मग पूढे ?

**व्यक्ती** : मग या भुमिगत केलेल्या लोकांना बाहेर काढयचं. आदी मानवतेकडे पोहचल्याने ते हिंसक झालेले असतील.

त्यांना नगरावर आक्रमण करायला पाटवायचे.

**माई** : नंतर ?

**व्यक्ती** : नंतर मग, नागरीकाधील जी अहिंसक जमात आहे त्यांना भुमिगत शहारात पाठवून हिंसक करायला सुरुवात करायची. ते हिंसक होइपर्यंत आक्रमण करणारे अहिंसक झाले असतील.

**बबा** : पण याचा फायदा काय ?

**व्यक्ती** : प्रत्यक्षात याचा तुम्हाला काहीच फायदा नाही. कारण व्यक्तीगत फायदयासाठीर ही योजना तयार करण्यात आलेली नाही. ही योजना आहे यंत्रणेच्या अस्तीत्वासाठी. म्हणजे, अहिंसा आहे असं दाखवून हिंसा धगधगीत टेवायची असा या मागचा उद्देश आहे. या योजनेला सगळया नागरिकांनी सहकार्य करावं अश अपेक्षा आहे. जे अहिंसक सहकार्य करणार नाहीत ते त्यांची जबाबदारी एका धनादेशा द्वारे यंत्रणा स्विकारेल परंतु या पुढे जास्त करणं तिला शक्य होणार नाही. कारण शेवटी हा यंत्रणेच्या अस्तीत्वाचा प्रश्न आहे. (हँडबॅग मधून काही फॉर्मस काढून ठेवतो.) या योजनेत सहभागी होण्याची तुमची इच्छा असेल तर हे फार्म भरुन ठेवा. हे घ्यायला परवा,आजच्याच वेळेला मी येइन. तुमचा पाहूणा म्हणून...

(सगळे गोठलेले बबा कासाविस होवून शिटी फुंकत राहते. ती वाजतच नाहीय.

भयाण शांतता वाढत असतांना – पडदा.)

---

# ‘३) मी

(पडदा उघडल्यानंतर समोर असलेल्या पालखीचे पुजन, आरती केली जाते. पालखी आतमधे नेली जाते. दोन पात्र रंगवस्त्र आणतात. त्यामागे गणपती आणि रिध्दी–सिध्दी गणेश स्तवन सुरु होते.)
संपल्यानंतर पुन्हा रंगवस्त्र आणले जाते रिध्दी सिध्दी गणपती आत जातात.)
(दोन जणं समोर येतात.)
१: तर मंडळी देवीच्या उत्सवा निमित्ताने आज या खेळाचे आयोजन केले आहे.
२: प्रथेप्रमाणे पालखीची पुजा झाली.
१: श्री गणेशाचे स्तवन झाले.
२: आता सुरु करीत आहोत आमचा खेळ
१: घटकाभर मनोरंजन एवढाच आमचा उद्देश आहे.
२: पण घ्यायचा म्हटला तर त्यात थोडा बाध सुध्दा आहे.
१: मनोरंजना मागून बोध यावा.
२: किंवा बोधामागून मनोरंजन यावे.
१: म्हणजे एका नाण्याच्या दोन बाजू असाव्या.
२: असं या खेळाच प्रयोजन आहे.
१: तर वेळ न घालवता, खेळाची जास्त माहीती न देता.......सादर करीत आहोत आम्ही आमचा खेळ .............
२: मी........ ( निघून जातात.)
१: अरेच्या इकडे कसली धावपळ, गडबड चाललीय ? काही तरी सोहळा आहे वाटतं. (ढोलकीची साथ कडाडते. हळूहळू मंद होते. डावीकडून उजवीकडे काही मुली डोहाळे जेवणाची गाणी म्हणत जातात त्या अनुषंगाने वापरायचे साहीत्य त्यांच्या हातात असल्यास उत्तम.)
१: त्या आत गेल्यावर सुध्दा त्यांचा मंद आवाज येत रहातो.
लाडक्या राणीला लागले डोहाळे
पुरवा सोहळे रामराया
२: अरे वा सिंगल पक्ष्याच्या एका घरात डोहाळे जेवणाचा कार्यक्रम दिसतोय.
१: हे असे डोहाळ्याचे सोहळे, काड कौतुक पुरवता पुरवता ९ म. ९ दिवस कसे गेले कळलचं नाही.
२: आणि एक दिवस बाळाच्या किलकारीने घर दणकून गेलं.
(आता समोरचा पडदा किंचित बाजूला होतो. त्यातून एका मुलीचे मुंडके बाहेर येते.)
आई ऽ मी आले.
(पार्श्वभूमीवर लहान मुलाचे रडणे. स्त्रियांचे हर्षोल्हासाचे आवाज.
: डाऊन स्टेजला एका कोपऱ्यात पाळणा. त्या भोवती जमलेल्या
काही स्त्रिया. बारश्याचा सोहळा. त्या अनुषंगाने गाणे –
हलके हलके जोजवा बाळाचा पाळणा.
( कुणीतरी काल्पनिक बाळाच्या कानात कु ऽर्र ऽऽ करत नाव ठेवते.
ते नाव पसरले जाते. जोना – मागील आवाज कमी होतात. पहिले
दोघ समोर येतात.)
१: प्रेक्षकहो अशा रितीन बाळाच्या बारशचा कार्यक्रम आटोपला आहे. आणि तिचं नाव जोना ठेवण्यात आलेलं आहे. आणि हिचीच गोष्ट आज सांगणार आहे.
२: ए........ थांब थांब, हे प्रेक्षक आपल्याकडे आशेन बघतायत.

१: आशेन नाही. तुझ्याकडे संशयाने बघतायत.

२: त्याच काय कारण ?

१: ही तुझ्या खांद्यावरची झोळी. आज काल अशा बेवारशी वस्तू दिसल्या की लोक संशयाने बघतात.

२: म्हणजे माझी ही झोळी बेवारशी ?

१: अरे झोळीला नाही. तुला म्हणालो मी.

२: (काही क्षण विराम घेऊन) मंडळी, या गप्पातली गंमत जाऊ द्या आता बघा एक खेळ विचारांशी त्याचा घाला मेळ.

१: गोष्ट आहे जूनी पुराणी । म्हटली तर एक नवी कहाणी ।

(आता मागे काही पात्र विशिष्ट हुंकार काढत आपआलप्या जागा घेतात. ते सिगल पक्षी आहेत. अंग स्वच्छ करणे, मासे पकडणे अशी त्यांची कामे सुरु आहेत.)

२: मंडळी, आपल्या या कहाणीची सुरुवात होते. एका बर्फाळ प्रदेशामधल्या बेटावरून.

१: या बेटावर रहायचे सिगल पक्षी. या सिगल पक्षाची तऱ्हाच विचित्र होती. पक्षी असूनही त्यांचे पंख छोटे आणि पाय मोठे होते

यांच्या पंखांचे बळ नसले तरी जीभेत भरपूर बळ होते. आणि अश्या त्या बेटावर सिंगल पक्षांची वसाहत होती.

२: वसाहत म्हणजे --

१: असते ते खेडे............. /

अंधारलेल............ /

बर्फाळकाढी होती गुजगोष्टी.

(हे म्हणत असतांना त्या गृपचे फॉर्मेशन)

१: असं म्हणतात या आपल्या बर्फापुढे समुद्र आहे.

२: आणि त्याच्या पलीकडे आणखी एक वेगळं जग आहे

३: त्या जगामधे मोठे मोठे डोंगर, दऱ्या आणि जंगल आहे.

४: त्या जंगलामधे एक भोर नावाचा पक्षी असतो.

५: भोर नाही रे घोर नावाचा पक्षी असतो तो.

६: वेड्यांनो भोर - घोर काही नाही मोर नावाचा पक्षी असतो.

१: पक्षी तर आपण आहोत.

२: पण तो आपल्यापेक्षा वेगळा असतो. त्याच्या शेपटीवर इंद्रधनुष्याचे रंग असतात आणि डोक्यावर फुलांचा पसारा असतो.

३: त्याला मोठे पंख असतात. इकडून तिकडे तिकडून इकडे तो उडून जातो.

(पुन्हा पहिले दोघे समोर येतात.)

२ : अशा त्या गावा गप्पांचा थवा. ऐकाया नविन श्रोतातर हवा.

१: तर मंडळी अशा ह्या खुट्ट्या पंखाच्या - गप्पांच्या - सॉरी पक्षांच्या थव्या मधे आणखीन एका चिमूरडीची भर पडली

( ते फॉर्मेशन)

१: जोना

२: जोना होती खूप सुजाण. उडवी सगळ्यांची दाणादाण.

(जोना आणि तिची आई)

जोना: आई आपल्या सुमुद्र पलिकडल जग म्हणजे काय ?

आई:  बाहेरच जग म्हणजे एक मोठं विश्वं. एक मोठं स्वप्न आपण बघू शकणार नाही असं. आपण आपल्या कवेत घेऊ शकणार नाही

जोना :  पण आपण का नाही आभाळ कवेत घ्यायचं ? का नाही ते स्वप्न बघाचं ?

आई:  कारण बेटा, आपल्या पंखांमध्ये तेवढं बळ नसतं.

जोना:  का ? आपण स्त्रि आहोत म्हणून ?

आई:  तसं समज बेटा

जोना :  पण मग तशी ताकद आपल्या बेटावरच्या पुरुषांच्या पंखांत सुध्दा  नाहीए

:आई  स्त्री आणि पुरुष हा प्रश्नच नसतो बेटा. प्रश्न असतो तो आपल्या पंखांच्या ताकदीचा. तुमच्या पंखामधे जर ताकद नसेल तर कसली स्वप्न पहाणार तुम्ही ? कोणत आणि कसलं आभाळ कवेत घ्याल?

जोना :  पण आई, एक वेगळ्या जगाच्या शोधासाठी पंखांमधे ताकद तर आणावीच लागेल ना ?

(हे दृष्य फ्रिज होते.)  ( पुन्हा पहीले दोघं समोर येतात. पुढी ओळी म्हणत असतांना त्यांना कोरसची साथ आणि शक्य झाल्यास त्या अनुषंगो फॉर्मेशन)

१+२:  पंखांचे स्वप्नच झाले ।  स्वप्नांना पंख मिळाले /
कुठल्या गावी.  कुठल्या देशी / डोळे आकाशी उडाले /

(व्यायाम गृहाचे फॉर्मेशन)

जोना:  काका, हे काय करताय ?

काका :  हे व्यायाम करताय बेटा ?

जोना :  व्यायामाने ताकद येते ?

काका :  भरूपर ताकद येते.

जोना ::  आपल्या पंखामधे सुध्दा ?

काका :  हो. पंखांमधे सुध्दा. पंखाच्या एका फटक्यात आपण समोरच्याला लोळवू शकतो.

जोना :  मला ती ताकद नकोय. मला माझ्या पंखामधे ताकद हवीय ती हा समुद्र पार करण्याची. माझी स्वप्नं आहेत ती या बेटापलीकडल जग पहाण्याची. ती ताकद तुम्ही मला मिळवून द्याल ?

१: मंडळी, अघटीत घडलेल आहे. जोनान् एका स्त्रीनं आपल्या पंखांमधे झेप घेण्याचा स्वप्न पाहिलं आह

१+२ :  पंखांचे स्वप्नच झाले .../ स्वप्नांना पंख मिळाले ........ /

आई:  पण हे कस शक्य आहे बेटा ?

जोना :  आई ......... तू सांग ना ...........

आई: (जोनाला) जोना मी म्हणते , ............. आपण ठरवायच आपल्याला काय करायचं ते.  आपण म्हणजे कोणी? तर प्रत्येकीने  आणि प्रत्येकजण म्हणजे कोण असतो ?

३:  मी......

४:  मी....

५:  मी....

६:  मी....

१:  ठिणगी पडता क्षणी, उसळे ज्वालामुखी भारी
किर्ती त्याची चौफेरी पसरे हो.....जी.......जी

२ :  आणि महाराज काम सांगावं, या जोनाचं नाव सर्वत्र घेतलं जाऊ लागलं. कुठे चेष्टेने. कुठे कुचेष्टेने. तर कुठे कौतुकाने ............

३:  जोना अशी ....... जोना  तशी ......
४:  ती तर एक वेडी पिशी.
५:  काय बाई पोर.
६:  पंखात आणायचं घेतेय बळ.
२:  हा तर शुध्द वेडेपणा.
३:  मूर्ख म्हणतो मीच शहाणा.
४:  आहो. मुलीच्या पंखात कसल आलय बळ ?
५:  सगळे असे बोलत होते. एक अघटीत घडत होते.

(फॉर्मेशन)

भल्या पहाटे सागर किनारी, जोना अपुली  प्रार्थना करी.

जोना :  हे सागरा, माझा प्रणाम स्विकार कर. तुला उल्लंघून मला नव्या विश्वात प्रवेश  करायचा आहे. हे सागरा, ते धैर्य, ते बळ मला तू  दे. मी तुला उल्लंघेन यात तू तुझा अपमान समजू नकोस कारण इथं मी तुझी बरोबरी करण्याचा किंवा वर्चस्व दाखविण्याचा प्रयत्न करत नाहीय्. मी फक्त   शोध घेतेय माझ्या पंखांच्या ताकदीचा. माझ्या पंखांमधे ताकद यावी यासाठी तुझ्या शुभेच्छा  मला हव्या आहेत. सागर शांतपणे तिची प्रार्थना ऐकत होता, त्याच धीर,

( गंभीर लाटांचा आवाज)

३:  गगन आहे विस्तीर्ण मोठे. पण पंख अपुले छोटेच छोटे.
४:  आपले पंख छोटे आहेत हे या मुलीला कुणीतरी समजवा हो.
सागर ओलांडायचा  हा कुठला हव्यास ? हा तर शुध्द मूर्खपणा  आहे.
१:  पण मंडळी कुठल्याश्या कविने म्हटले आहे.
२:  जगी हा वेडांचा पसारा मांडलेला ......
१:  अरे पण यांच्या वेडेपणातून. सृष्टीला नविन चेतना मिळते. चालना मिळते.
१+२:  निष्क्रीय जिणे लाजिरवाणे
पंखांसाठी व्हावे दिवाणे ऽऽ

(फॉर्मेशन)

जोना:  आई मी आता थांबणार नाही.
आई :  पण जोना हे कस शक्य आहे ?
जोना :  का नाही शक्य ?
:आई   आज पर्यंत हे वेगळं विश्व कुणीच बघीतलेलं नाही.
जोना :  म्हणून मी पण बघायचं नाही.
आई :  अग पण त्यासाठी आपल्या पंखात ताकद तर हवी ना.
जोना :  कमावू आपण ती ताकद.
आई :  अगं पण कशी ?
गृप :  स्वप्नांसाठी स्वप्नांसाठी ...... ।
जीवन स्वप्नंच व्हावे.....।
पंखासाठी व्हावे दिवाणे...।
(फॉर्मेशन)
जोना :  मला माझ्य कक्षा वाढवायच्यायत आई.  त्या ज्ञानाया असतील  आयुष्याच्या वाटचालीच्या असतील.

आभाळातलं प्रत्येक नक्षत्र मला खुणावतयं. ये आम्ही तुझी वाट बघतोय. जोना तुझ्यासाठी पायगड्या घातल्या आहेत आम्ही. आता फक्त हिंमत करायचीय ती तुला आणि ती हिंमत मी करणार आहे आई .........मी......मी.....

१: तर महाराज अशा तऱ्हेने जोनाने आपल्या मी पणाचा शोध घेतला तिला तिच्या स्व ची जाणिव झाली.

(फॉर्मेशन)

गृप : एका पहाटे मंगल समयी........ ।
सूर्येश्वराचा रथ हा येई......... ।

२: तर मंडळी सूर्यदेवाने या सृष्टीवर एका मंगल समयी पदापर्ण केले आहे. आणि त्या क्षणाला सगळी मंडळी बेटाच्या किनाऱ्यावर जमली आहेत. कारण आज आमची जोना एका वेगळ्या विश्वात झेप घेणार आहे.

(....... हमींग ..... आई, जोना, इतर --- निरोप समारंभ --- टची असावा असा. )

गृप: पंखांना आभाळ फुटले रे .....।
पंखात आभाळ शिरले रे ..... ।
पंख छोटे . आभाळ मोठे .....।
पंख मोठे. आभाळ छोटे ........।

१: रसिक हो, जोनाच्या इच्छेचा, तिच्या स्वप्नांचा शेवटी विजय झालाच. पंखांमधे बळ आणण्यासाठी तिनं शास्त्रशुध्द शिक्षण घेतल. त्या शिक्षणासाठी लागणारे कष्ट, लागणारी मेहनत, यांच्यासाठी मन पूर्णपणे एकाग्र केलं. त्याच फलित म्हणून काल पहाटे एका नव्या विश्वाच्या शोधासाठी तिन उड्डाण केल. खुरट्या पंखांच्या, खुरट्या पक्षांच्या त्यावेळी वेगवेगळ्या भावना होत्या. (फॉर्मेशन)

:३ हे असं दिव्य करणं म्हणे मुर्खपणाच लक्षण आहे.

४ : तर काय. मुलीच पाऊल एकदा का घराबाहेर पडलं, की समजा सगळचं बघडलं.

५: पण पोरीच कौतुक करायलाच हवं

६: संकटांचा सामना करत शिक्षण घेतलं. पंखांमध्ये ताकद मिळवली.

३: आता हे वेगळं विश्व पाहण्यासाठी बाहेर पडलेली पोर घरी परत येईल कां ?

४: कसची येतेय हो ? विश्वापलीकडे ही दुसर विश्वं असतच की, हे बघीतलं की ते बघायचं.

५: आपल्या पंखातल्या ताकदीचा साक्षात्कार झाला म्हणजे अहंकाराचा जन्म झालाच म्हणून समजा.

६: मी अशी, मी तशी. माझ्यामुळे हे. माझ्यामुळे ते.

३: शेवटी उरत ते फक्त मी.... मी... आणि मी.

२: मी पणाच्या सगळ्या छटा ऐकायला, बघायला मिळत होत्या. मी म्हणजे अहंकार. मी म्हणजे स्वार्थ. आणि मी म्हणजे ध्येय सुध्दा.

जोना: (रेकॉर्डेड आवाज) हे परमेश्वरा माझं ध्येय गाठतांना आणि गाठल्यानंतर सुध्दा मला मी पणाची बाधा देवू नकोस. ध्येय्य पूर्तीचं अहंकार माझ्यामधे निर्माण करू नकोस. माझं मी पण मला हवं आहे. ते फक्त पंख्यातली ताकद ओळखायचं. माझ मी पण हवं निरागस शांततेचं. माझं मी पण मिळवून दे मला कुटुंब आणि जन कल्याणाचं.

१: हा एवढा विचार करून, परमेश्वराची प्रार्थना करून निघालेली जोना आज पहाटे परत येणार आहे. ज्या ध्येयासाठी एका मंगलसमयी तिनं आकाशात जेप घेतली ते स्वप्न पूर्ण करून आज आता ती परत येणार आहे. सगळेजण तिच्या स्वागतासाठी किनाऱ्यावर जमले आहेत. त्यांच्या मुद्रेवर कौतुक आहे. कुतहल आहे जिव्हाळा आणि इर्षासुध्दा आहे.

(फॉर्मेशन)

काका: चला...... चला..........मागे व्हा............. मागे व्हावा सगळे.

आई: आली ? आली माझी जोना ?

काका: हो.... सांगतो सगळं. बसा, आधी बसून घ्या.

आई: पण जोना कुठं आहे ?

काका: आई, तुम्ही आधी बसून घ्या. आता मी काय सांगतो ते नीट एका.

आई: पण जोना .....

काका: सांगतो तेच सांगतो ........

आई: असं सांगतो, सांगतो म्हणून काय सांगताय तुम्ही.

काका: मला अस सांगायचय की आपण ठरवत असतो एक आणि नियतीच्या मनामध्ये वेगळंच काही असतं.

आई: म्हणजे ?

काका: म्हणजे असं की गगनाला गवसणी घालण्याच स्वप्न आपण पहातो. त्यासाठी पंखांमध्ये बळ सुध्दा मिळवतो. पण एकंदर विचार केला तर प्रत्येक ठिकाणी यश मिळतचं असं नाही.

आई: जोना कुठय ?

काका: आणि अपयश म्हणजे यश नसतंच असही नाही. आपण इतरांसाठी प्रेरणा ठरू शकतो. नव्हे ठरतोच.

आई: जोना कुठाय ?

(दोघजण स्ट्रेचरवर झाकलेलं कलेवर घेऊन येतात. आई हंबरडा फोडून इकडे तिकडे धावते. तिचे रडणे. बाकीचे जोनाच्या स्वागतासाठी आणलेले हार तिच्या कलेवरावर घालतात. शेकाकूल वातावरण)

(फॉर्मोशन)

गृप: कधी घडते.... कधी बिघडते ....। प्राक्तनातील घडून येते......।

१: वेगळ्या जगाची स्वप्न पहाणारी जोना स्वतःच स्वप्न बनून कुठल्या तरी अज्ञात प्रदेशात स्वतःच हरवून गेली. पण हरवून गेली अस तरी कसं म्हणावं. हो ती तर प्रेरणा देऊन गेली.

(अग्नी संस्काराचे दृष्य. मुलगी पुढे येते. जोनाच्या आई जवळ येते.)

३: आई...... जोनाला अग्नीडाग मी देणार आहे. कारण जोनाच्या स्वप्नांनी पाहीलेला प्रकाश मला माझ्या हातात घ्यायचा आहे. जोनाचे स्वप्न माझ्या हातात. माझे स्वप्नं हिच्या हातात. हिचे स्वप्न तिच्या हातात.

गृप :- स्वप्नांचे जग पंखात घेऊ. कर्तृत्त्वाने उडून जाऊ.........

आई :- देवारे ..... देवा या मुलींना यश दे. त्यांच भलं कर.

पार्श्व :- देवा ऽऽ देवा ऽऽ देवा

माथ्यावर हात असू द्यावा ।
जन्म असा दे, ध्येया लागून ।
मरण असे दे, मरणे लाजेल ।
त्याजसाठी करितो सेवा । माथ्यावर............. (१)
पंखांचे बळ वाढते व्हावे ।
हेच स्वप्नं कधी. कधीन विरावे ।
स्त्री जन्माचा ध्यास हा व्हावा । माथ्यावर........... (२)
रसिक जनांची करूनी सेवा ।
मुजरा करीतो, निरोप द्यावा ।
लोभ असावा लोभ असावा । माथ्यावर ........... (३)

--------------------(पडदा)--------------------------------

# ४) छिन्न राने

रसिकतेने सजवलेला दिवाणखाना. फोन आवश्यक.

राणी – वय विस – सोफ्यावर वाचत.

अशोक – वय पंधरा –क्रिक्रेटची प्रॅक्टिस करतोय.

संध्याकळचे साडेपांच.

काही क्षण हेच फोन वाजतो.

अशोक : हॅलो २१३३  कौन ? तनेजा ? ओह – हाय हौ आर यू अंकला । रूक्ष । कुछ नही बस पढ रही थी । हा. ना. पढाई नही. ऐसेही  नॉलेज पढ रही थी, नही आपने दि हुयी नही. दुसरी. नही. वो बाकी है अभी पढना । बळजबरी हसते । ना अंकल हम क्यूं नाराज होंगे आपसे ? वो आज कुछ अलग मुड था एकदम फ्रेश इसलिए आपकी नॉवेल जरा हाई है नां, वो जरा ध्यानसे पढनी पडेगी । बस बाकी ढिक चल हा है । नही अभीतक ममा नही आई । हां हांजी बाल दुंगी  अच्छा बाय् । ठेवते.

राणी :   कोण ?

अशोक : तनेजाचा फोन होता.

राणी : से तनेजा अंकल. ते मोठे आहेत तुझ्यापेक्षा.

अशोक : बट व्हाय ? आय डिडनट लाइक दॅट मन.

राणी : फाजील पणा करू नकोस. एस. एस. सी ला गेलं म्हणजे इंग्रजी येतंच असं नाही.

अशोक : एस. एस. सी चं विशेष नाही गं. पण प्रॅक्टीस पाहीजे इंग्रजी बोलायची आठवून कसं माहीतीय ?  फर्ड फर्ड इंग्रजी बोलता आयला हवं. कसं ?

राणी : फर्ड

अशोक : राईट कुणासारखं ?

राणी : कुणासारखं ?

अशोक : फर्नांडीस सारखं. थर्ड फर्नांडीस.

राणी : थर्ड ? नो मॅन. नो थर्ड.  फर्ड. फर्ड.  फर्नाडीस.

अशोक : नाही. फर्नांडीस थर्ड. त्याचा फोन तिसरा असतो. पहीला तनेजा. फोन वाजतो. हा शिरसाठ... आणि तिसरा फर्नांडीस. (फोन वाजतो)

राणी : हॅलो... कोण ? अय्या शिरसाठ काका. मी तुमचा आवाज ओळखलाच नाही. नाही आई अली नाही अजून. सांगेन हा आल्यावर सांगेन. बस. आराम चाललाय. अच्छा ठेवू ?

अशोक : या माणसाचे पोट किती मोठ्य नाही ? आमच्या क्रिकेट ग्राऊंडवरून दहा फेऱ्या मारायला लावल्या पाहीजे रोज. पळत.  माढ साला.

(तो फोन काढून खाली ठेवतो.)

राणी : फोन कशाला काढलास ?

अशोक : आता वाजायचा नाही तो.

राणी : अरे पण कुणाचा यायचा असला तर ?

अशोक : काही ऐवढे महत्वाचे फोन नसतात. आता फर्नाडीसचाच उरलाय. येवून जावून एकच प्रश्न. ममी आलीय? बोलाव तीला. आणि ती येईपर्यंत नसत्या चांभार चौकशा. परिक्षा कधीय ते विचारतात.

राणी : काय बिघडलं त्यांत ?

अशोक : पण रोज ? एकजात साले बिनडोक आहेत.

राणी : अशोक....

अशोक : त्यांना मी रोज काय सांगतो माहितीय ? परिक्षा कालच संपली. मला कोणीच आवडत नाही. तुला आवडतात ही माणसं ?

राणी : (क्षणभर गप्प. थकलेल्य स्वरात ) आपला प्रश्न नाही अशोक. ममी ----

अशोक : मला कंटाळा आलाय गं या सगळ्याचा. आपण पपांकडे जावू ?

राणी : आता आपल्याला त्यांच्याकडेच जायचंय.

अशोक : (उत्साहाने) बाबांकडे जायचं ! कधी ?

राणी : लवकरच.

अशोक : किती दिवस ! माझी प्रिलीम आहे. म्हणून विचारतोय.

राणी : कायमचं.

अशोक : कायमचं ? आणि माझी शाळा ?

राणी : तिथ ॲडमिशन घ्यायची तू. नाशीकला.

अशोक : आणि ममा ?

राणी : ती कॅलिफोर्नीयाला जाणार.

अशोक : एकटीच !

राणी : नाही. शर्मा अंकल बरोबर

अशोक : का ?

राणी : कुणास ठाऊक.

अशोक : कधी जाणार.

राणी : माहीत नाही. आपण बाबांकडे गेल्यावर जाईल बहुतेक

अशोक : आणि आपण ?

राणी : सांगीतलं ना तुला. आपण पपांकडे जायचं.

अशोक : आणि तिथं करमलं नाही तर ?

राणी : तुला तर आवडतं ना त्यांच्याकडे जायला.

अशोक : तुला नाही आवडत ? आणि आडतं म्हणजे दोन चार दिवसांसाठी. (विराम)आता ममीची आपल्याला सवय झाली न.

राणी : थांबून । तशीच पपांच पण होईल. विराम नाही झाली तरी करवून घ्यावी लागेल (स्तब्धता)

अशोक : तुला कोणी सांगीतलं ?

राणी : काय ?

अशोक : ममा कॅलिफोर्नीयाला जाणार ते ?

राणी : ममानंचं .

(स्तब्धता .....बेल वाजते......दोघं गप्प. बेल पुन्हा वाजते
ऱ्हस्व. दिर्घ...दिर्घ...दिर्घ
अशोक विमनस्क असल्यासारखा उठतो.राणी उदास. अशोक किंचीत पुढं हेवून आत निघून जातो.
राणी बघते आहे. पुन्हा बेल वाजते. मंदपणे उठून दार उघडते. दारात ममी – पन्नाशीची – खुरटलेले कसे. मधून रूपेरी छटा येवून बसते. मागून यंत्र झालेली राणी ।

मम्मी : अशोक कुठाय ?

राणी : आंत

मम्मी : काय करतोय ?

राणी : माहीत नाही.

(स्तब्धता)

मम्मी : तुला काय झालंय ?

राणी : काही नाही.

(स्तब्धता)

मम्मी : बरं वाटतं नाही ?

राणी : (किचींत त्रागा) नाहीगं, बरंय मला

मम्मी : मग अशी उदास काय बसलीस. मला नाही आवडत. माणसानं नेहेमी कस प्रसन्न असावं.

राणी : मग ! तुला बरं वाटावं म्हणून. कारण नसतांना वेड्यासारख हसत बसू.

(स्तब्धता)

अशोक : (तो येतो)

मम्मी : जरा पाणी आणतोस बाळा.

(न बोलतो तो आणून देतो तसाच जायला लागतो.)

मम्मी : काय चाललयं ?

अशोक : काही नाही (प्रयासाने) पुस्तक वाचतोय.

मम्मी : कोणतं ?

अशोक : अभ्यासाचं. जावू ?

मम्मी : काय झालंय तुम्हाला ?

अशोक : काही नाही. (स्तब्धता, ताण)

मम्मी : लक्ष जावून. फोन कुणी काढून ठेवला.

अशोक : मी.

मम्मी : का ?

अशोक : उगाच. (विराम) सतत येणाऱ्या फोनचा त्रास होतो म्हणून. (जातो.)

मम्मी : एरंडासारखी वाढतं जातात नुस्ती. यांना अकला कधी येणार कुणा ठावूक. (फोन उचलून ठेवतात.) कुणाचा फोन येवून गेला ?

राणी : तनेजा. (विराम) अंकल आणि शिरसाठ अंकल.

मम्मी : काही विशेष ?

राणी : (अकस्मात आवेगात) तू खरचं कॅलिफोर्नीयाला जाणारेस मॉम ?

(स्तब्धता)

मम्मी : अजून नक्की नाही (विराम) पण जावं लागेल बहुतेक

राणी : का पण ?

मम्मी : तुला सांगीतलंनं तेच. आता थकत चाललेय गं मी.

राणी : मग पपांशी डायव्होर्स तरी का घेतला?

मम्मी : तिथं पण थकून गेले होते मी.

राणी : (अगतीक होवून) आपण सगळे इथंच राहु या ना ममा. तू नौकरी सोडून दे. मी करेन सर्व्हीस. तुझ्या पेन्शन मधे होईल. (कासाविस झालेली) आम्हाला आता पपाकडे नाही होता यायचं मॉम. प्लीज....

(विराम)

मम्मी : वेड्यासारखं काय करतेस राणी ? मला आता पैसा नकोच कंटाळा आलाय वर्षनवर्ष एकटं बसून रहायला.

राणी : मग आपण पपांकडे जावू. आम्ही कोणी बोल----

मम्मी : ते पण नाही जमायचं राणी. आता परत कसं जाता येईल मग तर माझ्या येण्याला किंमत रहाणार नाही. आणि

आता हा ताकद नाही माझ्यात.

(विराम)

तुझ्या पपांना बोलवलंय मी. ते आल्यावर बोलेन त्यांच्याशी.

राणी : आणि त्यांनी आम्हाला न्यायला नाही म्हटलं तरं !

मम्मी : (कर्कश) मग मरेन मी इथंच तुमच्या बरोबर.

राणी : ममी........!(डोळे गरगरून भरलेले ) असं का म्हणतेस ?

(तिला हुंदका फुटतो. गदगदून ती रडायला लागते.ममी क्रमशः शांत होते.

अशोक : (ऐकून बाहेर येतो पूर्व नियोजीत सावध असल्या सारखा पुढे येत. हिस्त्रपणे.)

कां रडवलंस तीला ?

मम्मी : मी नाही रडवलं.

अशोक : (तसाच) का रडवल्स. जा तू. कॅलिफोर्नीयाला जायचंय ना तुला ?

मम्मी : अशोक

अशोक : काय आहे ? तुला काय वाटतं मला पणरडायला येईल हिच्यासारखं ? अरे हॅट, तुझ्यावाचून राहू शकतो मी. काही गरज नाही आम्हाला पपांकडे पाठवण्याची.(राणीकडे जातो)

तू कशाला रडतेस हिच्यासाठी ? जावू दे जायचं तर तीला. आपश दोघं राहू. मी नौकरी करेन. आणि आपण आता मोठे झालोय. आपल्याला कोणाचीच आठवण नाही येणार. पपांची तर येतच नव्हती. आली तरी केव्हातरी जाता येईल त्यांच्याकडे. इथं असतांना जात होतो तसे. (रूध्द होत) ममीला पण विसरून जावू हळूहळू. मी आठवण पण नाही काढणार तिची. (ते प्रसायाने पाणी थांबवण्याच्या प्रयत्नात. त्यामुळं नुसतेच अनियमीत श्वासोश्वास. स्पष्टपणे एकू येणारे पच्रंड ताणलेली स्तब्धता. फोनची रिंग येते. वाजत रहातो. कोणीच उचलत नाही. )

(अंधार)

(उजेड)

(त्यानंतर साधारण आठ दिवस. – सकाळ –

अशोक रायटिंग टेबल जवळ, काहीतरी लिहून पाकीटात बंद करतो. ममी येत)

ममी : –काय आहे ?

अशोक :– (आता तो विलक्षण समजूतदार वाटतो.) राणीचा अर्ज आहे. कसला ? ती सर्वीससाठी प्रयत्न करतेय. (विराम) माझ्या परिक्षेनंतर मी पण करणार आहे.

मम्मी : हा नसता शहाणपणा कोणी सांगीतला तुम्हाला ?

अशोक : कोणी कशाला सांगायला हवं मॉम. आमच्या भवितव्याचा आमचा आम्हालाच विचार करायला हवा. नाही का? (सारकास्टिकली) तू तर निघून जाशील कॅलिफोर्नीयाला.

मम्मी : (डोकं फिरून) मग इतके दिवस मी मर मर राबत असतांना ही झोपली होती कां ?

अशोक : ती लहान होती तेव्हा.

मम्मी : आता एका रात्रीतून मोठी झाली ती

अशोक : फक्त तीच नाही ममा. मी पण झालोय.

ममी :–(अगतीक होवून) तुम्हाला कसं समजावू रे ? काय समजवायचंय तुला ! (विकलतेने) काही नाही.

(स्तब्धता)

अशोक :– हा प्लॉट केव्हा सोडणार आहेस ?

ममी :– (ओरडून) मी उद्याच जात नाहीये.

अशोक :– मग !

ममी :– वेळ आहे अजून.

अशोक :– म्हणजे जाणार आहेसच.

ममी :– अशोक ............

(राणी येते)

राणी :– काय झालं ? (स्तब्धता) काय झालं ममा ? (स्तब्धता) अशोक ?

अशोक :–तुझं ॲप्लिकेशन तयार आहे.

राणी :– ममा का ओरडली ?

अशोक :– तिला लाच विचार. मला काय माहत.

राणी :– नीट उत्तर दे.

अशोक :–नाही दिलं तर काय करशील ?

राणी :– अशोक...........

अशोक :– तू पण जाशील ममा बरोबर ? का पपांकडे जाशील ? मी एकटा सुध्दा राहू शकतो. समजलं ?

(स्तब्धता)

राणी :– ममी.........

अशोक : – तीला त्रास देवू नको. एकटं, एकटं रहायचंय तीला ?

ममी :– (तोल जावून) थोबाडीत देवू कां एक ? मारण्यासाठी त्यांनी हात उगारलेला किचीत ही न हलता (अशोक बेदकारपणे. उभा ममीच्या नजरेस नजर देवून. ताण. सभेवर टेलीफोनची बेल. क्रमशः खचत जावून मी आत.

बेल वाजेतच आहे. अशोक उचलतो.

अशोक :–हॅलो – कोण ? नमस्ते.

राणी :–कोण आहे ?

अशोक :– शिरसाठ (फोनमधे) नाही राणी विचारत होती कोण आहे म्हणून. हो आहे ना. आत आहे., हो. बोलावतो. (राणीला)

ममीला बोलवताय. (फोनमधे) हो एक मिनीट येतेय. मी ? मजेत हो. परिक्षा ना ? हो जवळच आलीय. नाही. अभ्यास

वगैरे नाही अजून. हं. मी परिक्षा देत नाहीय. नाही. ड्रॉप बिप नाही. शिक्षणंच सोडायचंय मला.....

(दरम्यान राणीने ममीला बोलावलेले. शेवटची वाक्यं तनं ऐकली आहेत.वेगात पुढं होवून ती फोन हिसकावते. अशोक व्हिलनीश पणे बाजुला होतो.)

ममी :– हॅलो शिरसाठ मी माधवी बोलतेय. काय म्हणतोस ? नाही. अशोकच्या बोलण्याकडे लक्ष देवू नकोस. तू. गेल्या आठ दिवसापा सून त्याच्या डोळ्यात फरक पडलाय. नाही. फार सैल सोडल्याचे परिणाम आहेत. ते जावू दे. तू कशाला फोन केला होतास ? ऐकत रहाते. काही वेळ. नाही. नाही. हो अरे... हो, परवाचं रिझाइन दिलाय मी. लवकर कसला. आमच्या फर्मला किमान चार महिने आधी कळवावंच लागतं. तुला माहीत नाही का ? हो. सध्या जातेय मी कंपनीत. पण पंधरा दिवसांनी सुटी घेणारे दोन अडीच महीने. हो. पोरांची व्यवस्था करावी लागेल. तीच थोडी धावपळ होणार आहे. हो.. हो.. तू असं कर. आज संध्याकाळी घरी येवून जा. नाही. मी नाही बाहेर पडत आता कुठं. कंटाळा आलाय रे. बरं. चालेल ये मग. ठेवू ? ठेवते.

(स्तब्धता....... अशोक खुनशीपणे पहातो आहे. जावून रेडीओ लावतो मोठ्यानेच. कोणते तरी भडक संगीत किंवा गाणे. ममींचा नुसता संताप. ते अशोक एंजॉय करतो.)

राणी :– (हतबध्द. ––– ममीची अवस्था ओळखून.) अशोक. .....

अशोक :– (जणू गाण्यात भयंकर रमलाय.) हं.

राणी :– अशोक...

अशोक :– काय ?

राणी :– रेडीओ हळू कर. नाहितर आतल्या खोलीत जा.

अशोक :– का ?

राणी :– (थांबून) मला त्रास होतो.

अशोक :– मी आधी लावलाय. ज्याला त्रास होत असेल त्यानं जावं आतल्या खोलीत.

(राणी बधीर.

ममी उठून आत.

काही क्षणात अशोक रेडीओ बंद करतो.)

राणी :– आता कशाला बंद केलास ?

अशोक :–मर्जी माझी.

राणी :– का छळतोयस तिला ?

अशोक :– आपण कुणाला छळत बिळत नाही. आपलं नांव घ्यायचं नाही.

(स्तब्धता)

अन ती आपल्याला छळते ते चालतं वाटतं ? (विराम) इतके दिवस आम्हाला इथं ठेवलं. आणि आता म्हणते, पपांकडे जा म्हणून. (विराम) आणि काही दिवसांनी त्यांना पण वाटलं. जावं अमेरिकेला. म्हणजे आम्ही जा पुन्हा कोणाकडे तरी. आत्या. नाहीतर काकी. दोन खोल्यांचा घरात. बाथरूम पण धड नसते त्यांची. नाहीतर हा आपण दोघेच. दोन चार वर्षानी तु कोणाला तरी घेवून यायचंस. आणि सांगायचं. हा माझा नवरा. मी चालले. त्याच्या बरोबर. रहा तू तुझा एकटा.

आणि मी एकटा उरेल.

(कासाविस झालेला) आपण सगळे विसरून जावू एकमेकांना. मला नाही विसरायचं गं कुणालाच. मला सगळे हवे आहेत. तू, पपा, ममी... (स्तब्धता) आपण शर्मा अंकलना सांगीतलं तर ?

राणी :– ( उदास) काय ?

अशोक :–ममीला नेवू नका म्हणून.

राणी :–ते बळजबरीनं थोडीच नेतात तिला. तिलाच जायचंय. आपल्याला सोडून ? (स्तब्धता)

अशोक :– (हिंस्त्र आवेगात फुटून) पपांकडून आणलं कशाला मग आम्हाला ?

राणी :–हळू

अशोक :– का पण ?

राणी :–हळू म्हणतेय मी.

अशोक :– नाही. मोठ्यानंच बोलेन मी. विचार तिला. तू एवढी तिची बाजू घेतेस.

राणी :– मी तिची बाजू घेत नाहीय.

अशोक :–तिच्या समोर रेडीओ कशाला बंद करायला लावलास मग ? मी मुद्दाम मोठ्यानं लावला होता.

(राणी सहजगत्या हसते) हसू नकोस तू. तुझ्यामुळेच ती अशी वागते.

राणी –(तशीच) काय केलं मी ?

अशोक :– तुला सांगता येत नव्हतं. आम्ही नाही जात पपांकडे. आणि तू पण जावू नकोस.

राणी :–मी सांगितल्याने तिनं का एकलंअसतं ?

अशोक :– का नसतं ऐकलं ? आपण नाही ऐकत तिचं ?

राणी :–अरे ती मोठी आहे.

अशोक :–मग आपण लहान ? आणि समजा मी आहे लहान. पण तू तर आहेस ना मोठी.

राणी :– पण तिच्या एवढी कुठाय ?

अशोक :– म्हणून काय झालं. मोठी तर आहेस.

राणी :– कशावरून ?

अशोक :– कशावरुन काय, स्वयंपाक तर सगळा तूच करतेस.

राणी :–म्हणून मोठी ?

अशोक :–हं ! (आता तो बऱ्यापैकी नॉर्मल.) ए मला आम्लेट शिकव नं. अजून जळून जातं माझ्याकडून.

राणी :–अहा रे मोठा माणूस ! अजून ऑम्लेट करता येत नाही.

अशोक :–पण मला रात्री सोबत नाही लागत !

राणी :–मग ममी नसतांना मला का उठवतोस ?

अशोक :– आं... ते तुला एकयीला भिती वाटू नाही म्हणून.

राणी :–असं का...

अशोक :– हं... (किचींत हसत. स्तब्धता) ए... ममीला जावू द्यायचं आपण ?

राणी :– तुला काय वाटतं ?

अशोक :–जावू दे. आपल्याला पपांकडे पण रहाता येईल. आणि ती पत्रं पाठवेलच नं आपल्याला. आपण पण पाठवू. आणि मला नौकरी लागली की आपण सगळे जावू ममीकडे. चालेल ? (स्तब्धता. राणी गहीवरलेली. तिच्या जवळ जात.) ए..पण आपल्याला खूप आठवण येईल ना ममीची ? मला तर येईल. तुला ?

ती तशीच

–––अंधार............

(एका झुलत्या खुर्चीवर ममी झुलत. हाता कसलेसे पुस्त. पण लक्ष त्यात नाही. त्यांच्यावरच फक्त एक प्रकाशझोत.)

(पार्श्वभूमीतून पुरुषाचा आवाज. शक्यतो रेकॉर्डेह नसावा.)

आवाज :– माधवी....

ममी :– (खुर्चीतूनच) काय ?

आवज :– तुझं नक्की ठरलं ?

ममी :– हो.

आवाज :– मला नाही वाटत तू पुरता विचार केला आहेस. केलाय. आणि मुलं ..

ममी :–.ती माझ्या जवळ रहातील.

आवाज :–नाही. तू त्यांना नेणार नाहीस.

ममी :–वेड्यासारखं करू नका. ती तुमच्या पेक्षा जास्त माझ्या अंगावर आहेत. आणि लहान आहेत अजून., थोडी मोठी झाल्यावर अशोकला न्या, राणी ला राहु द्या वाटल्यास.

आवाज :– पण दूर जायलांच हवं का आपण ?

ममी :–तुम्हाला कसं समजावू हो ? नाही समजवता यायचं मला. कारण आजपर्यंतच्या आयुष्यात काही समजावताच आलं नाही. मला. ठरवलेल्या सगळ्या गोष्ट मनातच पुसल्या गेल्याा हळूहए. आणि मी ताच नुस्ती बघत राहीले, त्या पुसल्या जाताना. आणि त्या दडपणाखाली श्वास कोंडला जातोय माझा आजकाल. किती किती पध्दतीनं दूर आहोत आपण एकमेकांच्या, साध्या गोष्टींच्या सुध्दा टोकला उभं असतो आपण. हे नवरा बायकोचं नातं बंधनं आणतं आपल्यावर त्या पेक्षा आपण मित्र राहू एकमेकांचे.

(स्तब्धता)

आवाज :– कधी काळी माझी आठवण झाली तर परत येशली ?

ममी :–नाही.

आवाज :–गरज भासली तरी ?

ममी :–हो. तरीसुध्दां येणार नाही. खुपच कंटाळले तर दूर निघून जाईन कुठंतरी.

आवाज :–एकटीच

ममी :–माहीत  नाही. कदाचीत एकटी. कदाचीत काही अंतर कुणाबरोबर पुढं पुन्हा एकटी

आवाज :–आणि मुलं ?

ममी :–जाताना तुम्हाला देवून जाईन.

(स्तब्धता)

(घड्याचे अकराचे टोल. हातोड्याचा आवाज)

कोर्ट :(फक्त आवाज) हे कोर्ट श्री. विभाकर गणेश दिवाडकर व सौ. माधवी विभागर दिवाडकर, यांचा परस्पर संमती केलेल्या अर्जाचा विचार  करून, या उभयतांना घटस्फोट देत आहे. दोघांच्या संमतीवरून यांची संतती, अशोक विभाकर दिवाडकर, वय वर्षे तीन आणि रारी विभागर दिवाडकर वय वर्षे सात ही त्यांच्या आई जवळच राहतील.

(स्तब्धता)

(पुन्हा हातोड्याचा आवाज  शक्य झाल्यास किंचीत गडबड )

(अंधार......उजेड....पूर्ण उजेड. राणी उभी)

राणी :–ममा....ममा.... झोपलीस ?

ममा :–(विचारातून जाग्या होत) अं....छे.. अशीच बसले होते काय ?

राणी :–ममा एक विचारू.

ममा :–विचारनं, एवढं काय त्यात ?

राणी :–खरं....खरं.... सांगशील ? (ममा फक्त मंद हसते कौतुकाने ) खरं सांगायचं हं ममा. मी आता मोटी झालेय्. मला सगळं समजतं

ममा :–अगं पण विचारशील तर खरं.

राणी :–ममा तू डायव्होर्स का घेतला ?

(स्तब्धता...... अचानक फोन वाजायला लागतो.)

ममा :– हॅलो....शर्मा ? हं....हं....हं.... नाही. अजून नाही लावला. आताच लावते बघ. हो. हो रे. पत्र टाकलं होतं त्यांना. नाही. सगळं सव्तिर नाही लिहीलं. फक्त मुलांच्या आयुष्याचा प्रश्न आहे. ताबडतोब या असं कळवलं होतं. हो. पत्रं टाकून सुध्दां आठवडा झालाय. नाही अजून काही उत्तर नाही. हं.... कदाचित बाहेर कुठंतरी असतील टूरवर. हं... आज ट्रंक  लावून पहातेय नाशीकला हो. ाताच लावते. हं....हं....हं... चालेल. नंतर ये. आज नको. बरं. ठेवते. (फोन डिसकनेक्ट करतात डायल फिरवताता.) हॅलो. ऑपरेटर....हे पहा माझा नाशीकचा कॉल बुक करा. अर्जंट ३२४१२.. हो. पी. पी. मी ? २१३३ हं ठिक. (ठेवतात.)

राणी :–काय झालं ?

ममा :–तुझ्या पपांना पत्रं टाकलं होतं. अजून उत्तर नाही. आता फोन लावून पहातेय.

राणी :–(विषण्ण हसून) माझ्या पपांना ? खरंच.... माझे पपा तुझे कोणीच नाहीत. खरं ना ?

ममा :–राणी....

राणी :–इतकी तू दूर जावू शकलीस त्यांच्या पासून ?

ममा :–(उदास हसून) पहातेय आहेस तू.

राणी :–पण का ममा ? व्हाय ? का घेतला डायव्होर्स तुम्ही ?

ममा :त्याला इलाज नव्हता.

राणी :–असं कसं म्हणतेस तू ? तू इतकी समजूतदारपणे वागू शकते मग त्या वेळी तुला पपांशी नसतं ॲहजस्ट होता आलं ?

ममा :–(तोलून शब्द वापरत) आज माझ जे विचार, विचारांपेक्षा प्रॉपर शब्द, मनस्थिती आजची माझी मन:स्थिती जर त्या काळात असती तर कदाचीत ॲडजस्ट झालेही असते.

राणी :– एवढा, कोणता फरक पडलाय त्यावेळच्या आणि आजच्या मन:स्थितीत ?

ममा :–पडलाय बेटा, खरचं फरक पडलाय. आज मी उमेदीने लढू शकत नाही.

राणी :– आणि तेव्हा ?

ममा :– तेव्हा लढतं होते. --------- जग निर्माण केलं. तुम्ही लहान होता आपण इथं --------

राणी :–पणं असं लढायचंच का ममा ? का थकवायचं असं स्वत:ला, इतरांना

ममा :– त्याला इलाज नसतो राणी. काही माणसांचा जन्मं लढायसाठी झालेला असतो. त्यांच्या अंगाअंगातून उसळत्या समुद्राची गाज असते. त्यांना शाप असतो धावण्याचा. आणि त्यांच्या बरोबर जे बांधले जातात ना, त्यांची फरफटत असते. कारणं ते शांत असतात. कोणतेही वादळ त्यांच्याकडे वहात नाही. तुझ्या पपांच असंच झालं. लढण्यासाठी ते जन्मलेच नव्हते. आणि मला पावलापावलाशी मुकाबला हवा होता. मला धावायचं होतं. आणि ते रांगत होते. फारतर चालू शकले असते. आणि आम्ही एकमेकांना बांधूनघेतलं परस्परांशी. प्रत्येक क्षणाला आदळून पडल्याखेरीज का काय करू शकत होते आम्ही.

(विराम)

म्हणून मग मी वेगळं व्हायचा निर्णय घेतला. त्रास झाला आम्हाला दोघांनाही. विशेषत: तुमच्या मुळ. तो पर्यंत तुम्ही नसतां तर कदाचीत जेव्हा झालो, त्याही पेक्षा आधी आम्ही वेगळे झालो असतो. पण तुमचा अडसर बरे दिवस पुरला.

राणी :–कां ?

ममा :–कारण पोरांना कोणी ठेवायचं, हा प्रश्न त्रासदायकच होता. प्रत्येकाला एकेक ठेवता आला असता.

(राणी हसते. स्वतशी) का हसलीस ?

राणी :–मी आणि अशोक लहान होतो ना ममा, तेव्हा आम्ही पण असंच करायचो खाऊ किंवा बिस्कीटं अशीच एकेक वाटून घेत होतो. आणि एखां जास्त असलं तर काय करायचो माहिती ? अर्ध अर्ध तोडून घ्यायचो. (पुन्हा किंचीत हसते.) आम्ही तिघ असतो, तर काय केलं असतं ? असं अर्ध अर्ध वाटलं असतं च (कॉन्फीडन्टली हसून. विरामा नंतर ) नाही. तुम्ही तिघंही माझ्याचकडे आला असता ! तू इतकी स्वार्थी आहेस ममा ? पपांची इन्व्हॉल्वमेंट कुठंच नसेल ?

ममा :–नाही राणी. मी स्वार्थी नाही. इथं सुध्दा माझ्यातलं वादळ घोंघावत होतं. माझी मुलं सुध्दा मला, माझ्यासारखी हवी होती. जळत्या वादळाचा वेग घेवून धावणारी. त्यांच्या पपांसारखे निस्तब्धं पानाचं एकाकी झाड नको होतं मला. म्हणून हट्टाने तुम्हाला घेवून आले.

राणी :–पपांना वाईट नसेल वाटलं ?

ममा :–वाटलं होतं ना. पण तरी ते शांत राहीले. मला फार कौतु वाटतं त्यांचं कधी कधी. माझ्याकडून असं कोणी हिरावलं असतं तर सगळ्या जगाला आग लावून टाकी असती मी.

(विराम)

राणी :–किंवा ते तुझ्यावर फार प्रेम करत असतील. म्हणून शांत राहीले असतील.

(विराम)

ममा :–तसंही असेल.

(विराम)

राणी :– तुला आठवण होते त्यांची ?

ममा :–पूर्वी नव्हती होत फारशी. आता व्हायला लागलीय. म्हणूनच दूर निघालेय मी.

राणी :–पण त्याच्यासाठी दूर कशाला जायला हवं ममी ? एकदा तर गेलाच होता तुम्ही दूर. आता जवळ येवून पहाना.

ममा :–नाही राणी. आता नाही जाता यायचं तिकडे. आता वादळ मंदावत असलं तरी त्याचे अवशेष आहेतच असून. ते नाही जगू  देणार.

राणी :– किती छान घडलं हे सगळं. नाही ? तु तुझं वादळ घेून आलीस. ते वेगात असतांना सगळं उध्वस्त केलेस. आणि थांबल असतांना सुध्दा उध्वस्तंच करतेय. आम्हाला वादळ होता आलं नाही हा आमचा गुन्हाच झाला नाही ममा ?

ममा :–हो राणी. कारण मला आता जाणवलंय वादळाला  काळाच्या मर्याा असतात. प्रत्येकाचा कालावधी कमी जास्त असेलही, पण वादळं संपायचं असतं. केव्हातरी ते ओसरतंच. आणि मग डोळ्यासमोर न पाहीलेला प्रदेश असतो. एक तर पूर्ण नवखा. किंवा ओळखीचा, पण उध्वस्त झाल्याने परका भासणारा....तू....तू आज आहेस. उद्या लग्न होवून निघून जाशील. उरला अशोक. तो त्याचं घर. त्याची बायको....

राणी :–काय झालं ....

ममी :– कुठंय काही नाही शांत आयुष्य.( मोजकया निवडक लाटा. आणि त्याचे मर्यादीत आवाज.) अन् मी ? मी भाकस रिकामी. मनाच्या आत, बाहेर पूर्ण नवखा, अनोळखी प्रदेश. कुठल्याच ओळखीच्या सावल्या नाहीत. उन पण नाही उजेड, काळोस. काहीच नाही. मग काय असेल ? मी फार थकून जाते राणी या प्रश्नानं. कोणतंच उत्तर माझ्या जवळ नसतं....

(विराम)

राणी :–म्हणून मला जायचंय. त्रास होतोय. खूप त्रास होतोय. अगं, आतापर्यंत जपलेलं उन्हं सोडून निघालेय मी. पण जायला हं हे निश्चीत. तुम्हा पण त्रास होईल. दुखावले जाल. पण अजुनही वादळं खेळवण्यांची वयं आहेत तुमची....

(स्तब्धता)

(कोणतीच हालचाल नाही. अशोक ट्रे मध्ये चहा घेवून येतो. )

ममा :– तू केलास ?

अशोक :– (पसन्न हसून...) हो. येतो मला. (स्तब्धता) ममा मी डॉक्टर व्हायचं ना ? होईन मी. खूप अभ्यास करेल. आणि दवाखाना बांधल्यावर तुला बोलवेन. ममा, माझ्या हॉस्पीटलचं उद्घाटन तूच करावयचंस हं.

(विराम)

आणि राणी वकील होईल. तिच्या लग्नाला पण यायचंस ममा तू.

ममा :– आणि तुझ्या ?

अशोक :– त्याला वेळ आहे अजून. आणि जेव्हा करेल तेव्हा मी येईन तुला घ्यायला. कारण तू खूप थकलेली असशील.

ममा :– कशावरूंन ?

अशोक :–पपा म्हणत होते. एकटं असलंकी मनुष्यं फार लवकर थकतो. (विराम) आणि तेव्हा तू आलीस की जायचं नाही. तू, पपा, मी. आपण सगळे राहू. प्रॉमीस.

ममा :– (प्रयासाने भावना आवरतं) प्रॉमीस.

(फोन वाजतो.)

राणी :–(फोन  घेते. ऐकून.) ममा...पपा बोलताय नाशीकहून.. अशोक चल. आपण आत जाू. तू बोल ममा पपांशी.

(रिसीव्हर ठेवून दोघं आत जातात.ममी संथपणे जाून रिसीव्हर उचलतात.)

हॅलो.. विभाकर मी माधवी बोलतेय.

------------------(हळू हळु अंधार ...पडदा)------------------

## ५) अधांतरी

**१** : ये..... ये ना.

**२** : हो.. येतेय.

**१** : अगं ग किती घाबरतेस

**२** : छे. घाबरले नाहीये मी.

**१** : या असल्या वातावरणाला घाबरत नाहीय तू ?

**२** : (अनिश्चीत स्वरात) नाही. घाबरायचं काय त्यात.

**१** : हे तू तेवढ्यापुरतं म्हणते आहेस. मला तर वाटतंय की तू खूप घाबरली आहेस.

२ : (जरा जोरातच) मी घाबरलेली नाहीय.

१: खरंच ? नसशील कदाचीत आणि जरी घाबरली असतीच तरी त्यात आश्यर्च नव्हतं. अगं मी सुध्दा पहील्यांदा घाबरलेच होते.

**२** : हं.

**१** : कशी काय आलीस ?

**२** : सहज. भेटावसं वाटल. ( १ली हसते थांबल्यावर किंचीत वेळ घेवून) एक विचारू.

**१** : विचार ना. आणि एकच कशाला, खूप विचार. खूप...खूप... अगदी खूप.... गेल्या कित्येक दिवसात बाहेरच्या जगाशी बोललेच नाही मी. सदानकदा इथलंच रोगट वातावरण आणि तीच रोगट माणसं. (हसते) रोगट माणसं आणि मी सुध्दा त्यांच्यातून वेगळी थोडीच आहे. मी पण त्यांच्याच सारखी तरी मला इथलं वातावरण रोगट वाटतं ! किती गंमत आहे नाही. (हसत रहाते)

**२** : तुम्ही.... तुम्ही हसू नका ना अशा...

१ : हसू नको........ (प्रयत्नपूर्वक हसणं थांबवित) राहीलं पण तुला सांगू. आजकाल अशीच हसत असते मी. सारखी हसत असते. थोडं कोणी बोललं की लागते हसायला........तू मला काहीतरी विचारणार होतीस.........विचार ना

**२** : तुम्ही मला कसं ओळखलंत ?

**१** : हात्तीच्या एवढंच. अगं आफीसात होते मी. तेवढ्यात शिपाई सांगत आला मंजिरी मंजिरीच ना तुझं नांव

**२** : हो

**१** : –– मंजिरी महाडीक म्हणून कोणी बाई भेटायला आलीय म्हणून....आडनावावरून ओळखलं मी तुला. तू फक्त मंजिरी सांगितलं असतंस तर कदाचीत नसतं ओळखलं. त्याच्या मागे महाडीक होतं ना, म्हणून लगेच ओळखलं (उदास होत) मी पण अजून तेच आडनांव लावते. महाडीक. मला का आता बदलवता येणारे ते ?

**२** : (विषय बदलवित) तमचं कसं चाललंय ?

**१** : मजेत. सगळी कामं करते. आजकाल तर दिवसातला सगळा वेळ ऑफिसातच जातो माझा या बोटांनी जमेल तेवढं लिहीते सुध्दा.

**२** : खूप गेलीत काहो बोटं ?

१ : फारशी नाहीत. पहीलं एकेक पेर गेलंय. पण त्यामुळं पुर्वीचा सफाईदारपणा अुरला नाही हातात. ये आपण मधे बसू हं. एक मिनीट थांब. मी चहा सांगून येते.

**२** : नको.

**१** : अगं घे ना. मी करणार नाही. माणसाला सांगून येणार मी. बाहेरच्या लोकांसाठी वेगळी भांडी असतात. शिवाय त्याचं साहीत्य पण वेगळं असतं, आणि करणारी माणसं निरोगी असतात. प्रत्येक आठवड्याला इथल्या

सगळ्या निरोगी माणसांची तपासणी होते.

२ : त्या अर्थानं नाही म्हणाले नाही मी. त्याची फारशी आवश्यकता नव्हती म्हणून...

१ : बघ बाई. तुला फारसा आग्रह मी करू शकत नाही.– अरे, पण केव्हाचं मी तुला अगं. तुगं करतेय. चालेल ना तुला

२ : इश्य. न चालायला काय झालं ? तुमच्या लहान बहीणी सारखी तर आहे मी.

१ : होना. मला पण एक लहान बहीण आहे. तुझ्याच एवढी. पण अलीकडे खूप दिवसांत ती मला भेटायलाच आलेली नाही. तिचं काय. कोणी सुध्दा नाही. सगळी विसरत चाललीत मला. मला एक सांग, हे असं होणं माझ्या हातात होतं का ? आपण कुरुप व्हावं असं कोणत्या माणसाला वाटेल ? मग ही बाकीची माणसं अशी काय वागतात माझ्याशी ?

२ : तुम्ही मनाला लावून नका घेवू. आता मी आलेय ना. यानंतर नेहमी येत जाईन. आणि तुम्ही माझ्यसाठी चहा करणार होता ना ?

१ : मी नव्हते करणार. करायला सांगणार होते.

२ : तेच ते. मग सांगा ना. मी घेणार आहे चहा आणि तुमचा पण सांगा हं. माझ्याबरोबर तुम्ही सुध्दा घ्यायला हवा.

१ : मी येते सांगून.

२ : (दिर्घ श्वास भरून घेत.) इथं पाय ठेवल्यापासून तोच अुग्र दर्प दरवळतोय. म्हणून दवाखान्याचा कंटाळा येतो मला.कोणताही दवाखाना असो. प्रत्येक ठिकाणी हाच दर्प भिनलेला. जणू इथल्या प्रत्येक भिंतीतून तो ओघळतो. छतातून कोसळतो. इथल्या फुलाना सुध्दा हाच वास येत असेल का ? इथं यायच्या आधी हाच विचार होता. कोणत्याही दवाखान्यात क्षणभर जरी आपण थांबलो तरी आपल्याला घेरी येते. मळमळून वांती आल्यागत होतं. मग तिला भेटायला जावं का ? हा तर महारोग्यांचा दवाखाना. सोसवेल आपल्याला तो वास ? बघवतील ते झिजून गेलेले महारोगी ? पण केव्हातरी हिंमत करायलाच हवी. जाब विचारायलाच हवा सवत असली

म्हणून काय झालं. आणि आता कसली सवत.हिला सोडल्या नंतरच तर माझं लग्न झालं.........

१ : कसल्या विचारात गुंगलीय एवढी ?

२ : अं ? विचार ? कसला विचार ! छे......

१ : थोडा वेळ लागला. तो मेला माणूसचं नव्हता जाग्यावर.

२ : हं.

१ : (वेळ घेवून) कसं काय झालं लग्न ?

२ : छान झालं.

१ : हे आले होते. पत्रीका घेवून. मोजक्याच छापल्यात म्हणाले. पहिली पत्रीका मलाच दिली होती.

२ : हं.

१ : खूप इच्छा होती गं यायची.

२ : मग ?

१ : या असल्या अवस्थेत कशी येणार गं ? तुमचं लग्न होत ना त्या दिवशी दिवसभर माझं लग्न आठवत बसले होते बघ इथं असंच आहे. प्रत्येक जण स्वत:च्या कहाण्या आठवत बसतो. प्रत्येकाची कथा दुसरा कोण ऐकणार गं. कारण त्याला पण त्याच्या स्वत:च्या वेगळ्या वेदना असतातच. आणि मग एखाद्या दिवशी तुझ्यासारखा कोणी आला भेटायला की मग त्याला सगळं सांगत बसायचं. आता तूच तुझ्या लग्नाचं सगळं सांग.

२ : खूप चांगलं झालं. सगळे मजेत होते.

१ : मिरवणूक काढली होती कां ?

**२** : तर.. खूप मोठी मिरवणूक. ताशे. वाजंत्र्या, बॅन्ड. दारूकाम.

**१** : दारूकाम सुध्दा होतं का. माझ्या लग्नात नव्हतं.बॅन्ड पण नव्हता. फक्त गुरव. त्यालाच मंगल वाद्य म्हणतात ना

**२** : हं.

**१** : सांग आणखीन काय काय झालं ते सांग.

**२** : काय काय सांगू ?

**१** : सगळं सांग. पाहुणे किती होते. सगळे खूप हसत असतील. सगळीकडे कसं प्रफुल्लीत वातावरण असेल.

२ : होना. सगळीकडे खूप गोंधळ. खूप गडबड. गप्पा. हास्यविनोद.

१ : हो ? नव्या कपड्यांचा वास. मला खूप आवडतो तो. नव्या कपड्यांना वेगळाच वास असतो. त्यावर शपडलेल्या अत्तरांचा घमघमाट. वेण्या, गजरे. स्वयंपाक घरातून येणारा वास..... आणि या सगळ्यांचा एकवटून येणारा अुत्तेजीत गंध... माजी आठवणं झाली की नाही कुणाला ?

**२** : नाही. अं ! हो. हो हो झाली ना.

**१** : खरं सांग.

**२** : झाली. खरचं झाली.

**१** : मी सांगते. नसेल झाली. आणि खरं होतं गं ते. लग्न म्हणजे केवढा गोंधळ, कोण कोणाला लक्षात ठेवणार.

**२** : नाही. तसळ नाही.

**१** : तसं असलं तरी काय फरक पडतो अुलट तेच स्वाभाविक आहे. अशा मंगल क्षणाला अमंगल आठवणी नकोतच. प्रत्येक जण निरोगी व्यक्तीमत्वाचा. अशा वेळी रोगट, आठवण कशाला. हे सुध्दा विसरले असतील मला. विसरले असतील, आपली पहिली बायको एका महारोग्यांच्या दवाखान्यात. क्षणाक्षणाला झिजते आहे. येणारा प्रत्येक क्षण तिच्या शरीरातला सापडेल तो तुकडा घेवून पळतो आहे यांच्या लक्षात सुध्दा नसेल. माझे किती अवयव चांगले राहीलेत म्हणून. कोणालाच नव्हती ना माझी आठवण. खरंच सांग.

३ : नव्हती खरंच सांगते. कुणालाच नव्हती तुमची आठवण. (हिस्टेरीक होत जाते) आणि कां व्हावी. त्या आनंदाच्या क्षणी तुमचीच आठवण का व्हावी. तुझी अशी कोणती पुण्याई होर्ती तर तिथे फक्त तुझीच आठवण रहावी. मी कोणतं पाप केलं होतं, की माझं अस्तीत्व सुध्दा जाणवू नये. (प्रचंडपणे रडते. रडत रहाते. नंतर क्रमश: व्हायोलंट होत जाते.)सांग. सांग आता. तुझी कोणती पुण्याई होती. माझी आठवणं कोणालाच नाही. लग्न माझं. तो सुख सोहळा माझा पण मी मात्र कुठेच नाही. सगळीकडे तुझीच अभद्र सावली. माझ्या आयुष्याचा सर्वोच्च आनंदाचा, असा तो क्षण होता. पण सगळ्या माणसांवर तुझीच छाया. अत्तरांचा वास नव्हता. नव्या कपड्यांचा सुवास नव्हता. कोणीच मनमोकळं हसत नव्हतं. मन भरून बोलत नव्हतं. नुसता शुकशुकाट.एखाद्या प्रेतयात्रेच्या वेळी जाणवावी, तशीच, तेवढीच कुजबुज. मला तर वाटायला लागलं, आता कोणत्याही क्षणी एखाद्या महारोग्याच्या अवयवा सारखा हा मांडव गळून पडावा. सगळीकडे घाबरून वावरत होते.सर्व दूर त्याच थंड नजरा. तेच ओढले चेहरे. अंग चोरून सगळ्या मांडवातून फिरत होते. वाटायचं भोवताली सगळे महारोगीच पसरलेत सांग. माझे ते क्षण ऊध्वस्त करून तुला काय मिळालं. (१ ली हसते) हसू नकोस. मी म्हणते हसू नकोस. गळा दाबीन मी तुझा (ती थांबते).मला माहीतीये तुला आनंद झालाय. माझा सुखसोहळा विस्कटलेला बघून तुला बरं वाटतंय.

१ :: मला बरं वाटलं ! खरं सांगू मला वाटच होतं. हे असंच होणार म्हणून. म्हणून हसायला आलं. महारोग्यांच असंच असत. त्यानं घर जरी सोडलं तरी त्या घरावरची त्याची सावली पुसली जात नाही. कितीही पुसायचा प्रयत्न केला तरी बाकीच्यांच्या वागण्यातून ती जाणवत रहाते. माझ पण तसच झालं. माझी सावली तिथं व्यापून राहिलीय. तिथल्या घराला, शुध्द हवेला.

२ : शी. किती घाण विचारांची बाई आहेस तू

१ : विचारांची ? मग त्यांच्या पेक्षा कित्येक पटींनी तर माझं शरीर घाणं आहे. आणि मग त्याच्या सान्निध्यात राहून मन पण तसचं होत चाललय. दिर्घकाळ साचून राहीलेल्या पाण्यासारखं कुजून गेलंय. म्हणून मग त्यात असले विचार येत राहातात.ते जावू दे. तू पहील्यांदाच इथं येते आहेस. आणि आपण लगेच भांडायला लागलो. पण ते बरं झालं. भांडणाने माणसं एकमेकांच्या जास्त जवळ येतात. आता कसं काय चाललंय तूझं ! काही नविन विशेष ?

२ : नाही.

१ : होईल.तेवढ्यासाठीच तर हा सगळा गोंधळ असतो. सगळीकडे शरीर आणि शरीराचं महत्व. माझा मुलगा काय म्हणतोय ?

२ : मजेत आहे. चवथीत घातलंय त्याला.

१ : बऱ्याच दिवसात त्याला पण बघीतलं नाही. पण तो माझा मुलगा म्हणून तुम्ही त्याचा तिरस्कार करू नका हं. माझी तपासणी झाल्यावर त्याची पण तपासणी करून घेतली. फक्त त्याचीच नाही, घरातल्या सगळ्यांची करून घेतली. (स्वत:च हरवते) आणि माझी तपासणी झाल्यापासून सगळ्यांच्या नजरा गढूळत गेल्या. प्रत्येक जणं मला टाळायला लागला. औषधं घेत होते. तरी पण शरीर बदलायला लागलं. शेवटी डॉक्टरांनीच सांगीतलं येथे येवून रहा म्हणून आले. झाले. त्या गोष्टीला सुध्दा आता ३ वर्ष झालेत. सगळं सोडून द्यावं. कशाला जुन्या आठवणी ऊकरून काढायच्यात पण त्याच्या शिवाय दुसरं काही नाही माझ्याजवळ. नविन गोष्टी आता तू सांगायच्यात. लग्न झाल्यावर कुठं गेला नाहीत. बाहेर...

२ : नाही. नाही गेले.

१ : कां ?

२ : ऊगीच.

१ : ऊगीचं ? म्हणजे ?

२ : ऊगीचं म्हणजे अुगीचं. नाही गेलो. जायचं नव्हतं म्हणून.खरं सांगू कुणाच्या लक्षात सुध्दा नव्हतं अशा वेळी बाहेर जायचं असतं म्हणून.सगळ्यांच्या नजरातून दिसत होतं. परत तुमचंच लग्न होतय म्हणून. परवा तर हे सुध्दा म्हणाले. एकदम रात्री झोपेतून उठले. सांगायला लागले, तुमचं स्वप्न पडलं म्हणून. तुमचं आणि त्यांच परत लग्न लागतंय. आजुबाजुला सगळं महारोगी. ते अक्षदा अुधळताय. वाजींत्र्या वाजवताय. बराच वेळ घाबरून बसले होते.

१ : अगं स्वप्नचं ते. पण स्वप्नांवर फार विश्वास हयांचा. शकून समजतात म्हणे. आपण जर सांगीतलं ना स्वप्न पडलं म्हणून, तर सारखे विचारत रहाणार, केव्हा पडलं, काय दिसलं, पाणी दिसलं का, कोणकोणते रंग दिसले. अजून करतात का तसं ?

२ : कुणास ठावूक. करत असतील. बोलत नाहीत.

१ : का गं ? कमी बोलायला लागलेत कां आजकाल ?

२ : नाही खूप बोलतात.

१ : काय काय बोलतात गं तुम्ही. सगळं संसारा बद्दलच बोलत असाल. पहीला मुलगा हवा की मुलगी. त्याचं नाव काय ठेवायचं हे सुध्दा आतापासूनच ठरवलं असणार. काय नाव ठेवणार आहात.

२ : अजून ठरलेलं नाही.

१ : अजून ठरवलं नाही? कमाल आहे. अगं दोन महीने होत आहेत ना तुमच्या लग्नाला मग. अजून ठरवलं नाही. या गोष्टीतर पहील्याच रात्री ठरवायच्या असतात. मी पण ठरवल्या होत्या. पहील्याचं रात्री हे तर खूप हसले. म्हणले. अजून कशाच काही नाही आणि तुला पोरं सुचताय ! आता हसू येतं त्या गोष्टीचं. पण त्यावेळी भयंकर हळव्या मूड मधे असतो आपण. नंतर कळायला लागतं. सगळा मुर्खपणा आहे म्हणून. आपण मुली तर खूप अलवार असतो. जाण आल्यापासून वेगळ्या विश्वाचे वेध लागायला सुरुवात होते. मी शिकत होते. बी. ए.

होणार होते. पण मला खात्री नव्हती. कोणत्या निश्चीत वर्षी आपले लग्न होईल म्हणून. परावलंबी रहातो आपण. आईवडील सांगतील ती पूर्व. आपलं स्वतःच कोणतंच मत नाही. निवडीचा चॉइस आपला नाही. जो पुढं येईल त्याला आपला म्हणायचं. कारण आपल्या भल्यासाठीच आई वडील सगळं करतात.पण ते फक्त शरीर बघतात गं. शरीर शरीराला जुळतात की नाही. पोरगी सुखात राहू शकेल. चार चौघाच्या नजरेत खुपू शकेल एवढा पगार आहे की नाही. बस्स. एवढच. या पलीकडील डायमेन्शन त्यांना नसते. थर्ड डायमेन्शन – मनाची या बाबतीत विचारात घ्यावी असं कुणालाच वाटत नाही. आणि मग असं लग्न झालं की प्रत्येकला वाटत रहातं आपण सुखात आहोत म्हणून. तुला कंटाळा तर येत नाहीना. आजकाल असा विचार करायला शिकलेय मी. असं अलिप्त राहून विचार केला म्हणजे सगळं खोटं वाटायला लागतं.

२ : होना. माणसं खोटी वाटतात. त्यांच्या भावना खोट्या वाटतात. संबंध खोटे वाटू लागतातं. शेवटी शरीर महत्वाचं. ते चांगल आहे, तो पर्यंत सगळे तुमचे.

१ : हो तर. पण ज्या शरीरावर तुम्ही प्रेम करता ते किती खराब आहे हे अशा प्रसंगा नंतर समजतं. आणि एकदा का शरीराचा घाणपणा जाणवला की त्याच्या सगळ्या ओढी जळून जातात. पण तरी शरीराला शरीराचं आकर्षण वाटतच असतं.

२ : कारण दोघंही घाण असतात. एका महारोग्याल दुसऱ्या महारोग्याची किळस वाटत नाही. तसाच हा प्रकार आहे. कारण दोघंही रोगीच.

१ : (किचींत काळ घेवून) आपले विचार किती सारखेच आहेत नाही. खूप बरं वाटलं बघ तुला भेटून. अगं एका विचारांची माणसं सहसा भेटतच नाहीत बघ. पण एवढ्यातच असे वैराग्याचे विचार चांगले नाहीत हं . अजून खूप खव्हायचंय तुझं. एवढ्यात हे विचार करायला लागलीस तर पुढे कसं व्हायचं ?

२ : (तिव्रपणे) हे विचार माझे नाहीत. माझे नव्हतेच. लग्न करून या घरात आले. तेव्हा खूप वेगळे विचार होते माझ माझं भावनांमधे गुंतलेले, भावनांचीच स्वप्नं पहाणारे. पण नंतर माझे विचार बदलायला लागले. माझ्या इच्छेविरूध्द तुमच्या विचारांचा पगडा बसायल लागला माझ्या मनावर.

१ : माझ्या विचारांचा पगडा ? आणि तो कसा काय ? ही तर पहिलीच भेट होतेय आपली.

२ : आपली प्रत्यक्ष भेट पहिलीच असेल कदाचीत. पण तुमच्या विचारांची रोज भेट होतेय माझी. तुमच्या नवऱ्याच्या तोंडून तुमचं हे तत्वज्ञान रोज ऐकते मी.

१: माझा नवरा ? माझा नवरा तुझा कोणी नाही ? अगं अुलट तुझा नवरा आता माझा कोणी नाही. त्यांची पहिली बायको असले तरी घटस्फोटीता आहे मी.

२ : तुमच्या घरात पाय ठेवल्यापासून मला वाटायला लागलंय, या घरावर माझा काहीएक अधिकार नाही. ते सर्वस्वी तुमचं आहे. माझ्या पहील्या रात्री मी सुध्दा तुमच्याच सारखी वेडी होते. मी सुध्दा त्या गोष्टी ठरवल्या होत्या. पण त्या रात्री तुमचा नवरा हसला नाही. शरीर किती फसवं असतं, याचं, तुमचं सगळं तत्वज्ञान ऐकवलं. त्या रात्री आम्ही शरीर नसल्यासारखी शरीरं वापरली. आणि मग त्या दिवसापासून रोज तेच शरीर झडीचं ाख्यान लागायला लागलं. हळूहळू मला वाटाय लागलं, या घरातल्या सगळ्याच लोकांना महारोग झालाय. मनाचा महारोग. यांची सगळ्यांची मनं झडून गेलीत. आणि शरीराचा केवळ सापळा उरलाय. आणि एकदम दचकले. लक्षात आलं, आपण सुध्दा मनाने महारोगी बनत चाललोत. यांच्या सारख्याच विचार करायला लागलो. गेले दहा बारा दिवस झाले मी सासूबाईंच्या जवळ झोपते, कारण शरीरंच नकोशी झालेली

१ : म्हणायचंय काय तुला ?

२ : मला एकच विचारायचय. तेवढ्याच साठी मी आले. तुम्ही तर शरीरानं झिजतंच होता, मग याना मनाने झिजण्याची लागण का लावलीत ? त्यांना मनानं निरोगी का राहू दिलं नाही ?

१ : पण कसं काय ?

२ : तुमचे विचार तुमच्या पुरतेच ठेवायचेत. सगळ्या घरात संसर्गजन्य रोगासारखे पसरवून तुम्हाला काय मिळालं?

१ : माझे विचार माझ्या पुरतेच ठेवू? कसे काय ? अगं ते तर प्रत्येक क्षणाला या रोगासारखे फुटून येताय. तूचं सांग मी काय करायला हवं होतं ?

२ : मी ? मी कोण सांगणार आता मी सुध्दा तुमच्याच पंथातली एक होणार आहे. तुमच्याकडे या रोगांची एखादी लस आहे कां ? मी ती टोचून घेते. म्हणजे मला उघडपणे तुमच्यात येता येईल. त्या घरात मला राहाता येणं अशक्य आहे. सारखं डोकं फाटत रहातं. वाटतं, शरीर घाण आहे. कशाला अर्थ नाही, मग जाणवतं, म्हणून त्याचा तिरस्कार करायचा असं थोडीचं आहे. सगळे जगताय. आपण पण फुलावं. आणि यात मी फाटत रहाते. तुम्ही अशा शरीरानं झिजत जाणाऱ्या. माझा नवरा – तो मनानं झिजतं जाणारा. मला सांगा, मी काय करू ? मला झिजता पण येत नाही आणि उमलता पण येत नाही. मग मी काय करू? सांगा. आयुष्यभर अशीच राहू ? घटस्फोट घेवू ? मला सामा जीवन जगताच येणार न ? अशीच रहाणार ? कायमची ? अधांतरी ??????

(रडते. रडत रहाते. बराच वेळ.)

---

# काही क्षणचित्रे



Last Angvish



Holi



Changuna



Tujhe aahe tuj pashi

# पुरुषोत्तम तळेगांकर यांचे अप्रकाशित साहित्य

## एकांकिका :

१. सारे प्रवासी घडीचे
२. लास्टअँगविश
३. अनोळखी
४. घनदाट
५. मेघ सावल्या
६. कावळयांची शाळा
७. शाळा हरवल्याची गोष्ट

## नाटक :

१. खेळिया – महाराष्ट्र राज्य नाटय परिषद पुरस्कार प्राप्त
२. उत्सव
३. कोर्टमार्शल – स्वदेश दिपक यांच्या हिंदी नाटकाचा अनुवाद

**एकपात्री :** रॉंग नंबर

